






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

वर्ष ३२ : अंक १२६ जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९

या अंकांत

डॉ. म. गो. माईणकर, प्रा. म. म. वा. वि. मिराशी, प्रि. शं. वा. दांडेकर, भ. श्री. पंडित, वा. रा. ढवळे, चिं. ग. कर्वे, गो पु. पटवर्धन, प्र. ल. गावडे. शिवाय संपादकीय, परिषद्-वार्ता, साभार-स्वीकार व पत्रव्यवहार इत्यादि.

१७

, पुणें २.

# परिषद्‌वार्ता

( चिटणीसांकडून )

**कै. वा. म. जोशी स्मृतिदिनः**—दि. २० जुलैला कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचें 'आजची मराठी कादंबरी' या विषयावर व्याख्यान योजिलें होतें. तथापि मुंबईतील अतिवृष्टीमुळे व्याख्याते पुण्यास येऊं शकले नाहीत. व्याख्यान स्थगित करावें लागलें. अर्थात् याप्रसंगीं प्रा. रा. श्री. जोग यांच्या हस्तें कै. जोशी यांच्या छायाचित्रास पुष्पहार घालून स्मृतिदिन पाळण्यांत आला.

**कै. रावसाहेब जोशी दुखवटा सभाः**—परिषदेचे भूतपूर्व चिटणीस व कार्याध्यक्ष रावसाहेब र. लु. जोशी हे दि. ४ ऑगस्टला विकाराबाद येथे ख्रिस्तवासी झाले. त्यांच्या दुःखद निधनानिमित्त शनिवार दि. ९ ऑगस्टला मा. प. सा. मंदिरांत श्री वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेने दुखवटासभा भरली होती. सभेंत म. म. प्रा. द. वा. पोतदार, श्री. चिं. ग. कर्वे, प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. श्री. के. क्षीरसागर व नाशिकचे श्री. वा. श्री. पुरोहित यांनी गुणवर्णनपर भाषणें करून रावसाहेबांना श्रद्धांजलि वाहिली. कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर यांनीहि प्रास्ताविक भाषणांत रावसाहेबांनी केलेल्या परिषदेच्या सेवेचा यथोचित शब्दांत गौरव केला. सभेने पुढील ठराव सर्वसंमत केला. 'म. सा. परिषदेचे भूतपूर्व चिटणीस व कार्याध्यक्ष, मायबोलीचा एक जाज्वल्य अभिमानी व कवि रावसाहेब र. लु. जोशी यांच्या सोमवार दि. ४ ऑगष्ट १९५८ रोजीं विकाराबाद येथे झालेल्या निधनाने मराठी भाषिकांची व विशेषतः महाराष्ट्र साहित्य परिषदेची खूप मोठी हानि झाली आहे. चिटणीस या नात्याने त्यांनी केलेली परिषदेची सेवा, केलेलें मार्गदर्शन व परिषदेच्या कार्याला लावून दिलेलें वळण याबद्दल म. सा. परिषद् ही त्यांची सदैव ऋणी राहील. परमेश्वर रावसाहेबांच्या आत्म्याला चिरशांति देवो.' श्री. मो. रा. वाळंबे यांनी आभार मानल्यावर सभेचें काम संपलें.

**कवि दिनकर यांचें काव्यगायनः**—हिंदीचे सुप्रसिद्ध कवि दिनकर ऑगष्ट महिन्यांत पुण्याला आले असतां त्यांच्या काव्यगायनाचा कार्यक्रम परिषदेतर्फे दि. ११ ला घडवून आणण्यांत आला. याप्रसंगीं मराठींतील सुप्रसिद्ध कवि श्री. यशवन्त, श्री. वि. द. घाटे, सौ. संजीवनी मराठे, श्री. बा. भ. बोरकर व सौ. पद्मा गोळे यांनीहि निवडक कविता गाऊन दाखविल्या. कार्यक्रमास बराच रसिकवृंद उपस्थित होता.

**आचार्य अत्रे यांचा सत्कारः**—महाराष्ट्राचे प्रख्यात साहित्यिक व झुंजार पत्रकार आचार्य प्र. के. अत्रे यांच्या षष्ठ्यब्दपूर्तीनिमित्त रविवार दि. ३१ ऑगस्टला स. प. महाविद्यालयाच्या देवी रमाबाई सभागृहांत त्यांचा म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेने प्रकट सत्कार करण्यांत आला. सत्कार-समारंभ म. सा. परिषद् व मराठी नाट्य परिषद् या ेन संस्थांच्या वतीने योजण्यांत आला होता. समारंभाला सभागृहांत व बाहेरच्या आवारांत गर्दी जमली होती. परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. पेंढरकर यांनी प्रास्ताविक भाषण करून सूचना केली. नाट्यपरिषदेचे चिटणीस श्री. गो. म. वाटवे यांनी सूचनेला ेलें. यानंतर म. सा. परिषदेचे चिटणीस प्रा. चंद्रकुमार डांगे यांनी संदेश वाचून ी संस्थांतर्फे सत्कार करण्यांत आल्यानंतर श्री अत्रे यांना श्रीफल व शाल अर्पण ाध्यापक अनंत काणेकर, श्री. वसंत शांताराम देसाई, प्रा. श्री. के.

[ पुढील मजकूर कव्हर पान ३ वर पाहा. ]

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे



वर्ष ३२, अंक १२६ | जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९५८

## या अंकांत



'नाट्य संगीत' व 'नभ अंकुरलें' या पुस्तकांचीं परीक्षणें आकाशवाणी, मुंबई केंद्र, यांच्या सौजन्याने दिलीं आहेत.

— संपादक.

संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य परिषद्

**मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी आपल्या परिचितांना व मित्रमंडळींना म. सा. परिषदेचे सभासद करून घ्या.**

साधारण सभासदत्वाची वार्षिक वर्गणी ३ रु. तहह्यात सभासदत्वाची ५० रु.; म. सा. पत्रिका सर्व सभासदांना वरील वर्गणींतच पाठविली जाते. संस्थांसाठी म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी रु. ४=५० आहे. सभासद वा वर्गणीदार केव्हांहि होतां येते.

## साधारण सभासदांना विनंती

परिषदेचें नवें वर्ष सुरू होऊन ६ महिने झाले आहेत. सभासदांनी आपली वार्षिक वर्गणी पहिल्या तिमाहींत भरावी असा नियम आहे. वर्गणी पाठविण्यासंबंधी गेल्या अंकीं विनंती केली होती. बाकीदार सभासदांना नुकतीच स्मरणपत्रेंहि पाठविलीं आहेत.तरी अद्याप ज्यांनी वर्गणी पाठविली नसेल त्यांनी ती सत्वर पाठविण्याची कृपा करावी. **'पत्रिके'चा पुढील अंक बाकीदार सभासदांना व्ही. पी. ने पाठविला जाईल याची कृपया नोंद** घ्यावी. शाखासभांच्या कक्षेतील सभासदांनी शाखेकडे वर्गणी भरली तरी चालेल.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—
चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्
टिळक रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३२, अंक १२६ जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९५८

## संपादकीय

### कै. रावसाहेब र. लु. जोशी

गेल्या ४ ऑगस्ट १९५८ रोजीं महाराष्ट्रांतील एक तळमळीचे साहित्यिक कार्यकर्ते व समाजसेवक रावसाहेब रघुवेल ल्यूकस जोशी हे विकाराबाद (द. हैद्राबाद) येथे आपल्या मुलीच्या घरीं वयाच्या ८८ व्या वर्षीं खिस्तवासी झाले! रावसाहेबांचें वय लक्षांत घेतां त्यांचें निधन हें अकालीं झालें असें मुळीच म्हणतां येणार नाही; किंबहुना त्यांना दीर्घायु लाभलें व तें त्यांनी साहित्यसेवा व समाजसेवा या सत्कारणांत खर्च केलें असेंच म्हटलें पाहिजे. पण त्यांचा तो उदंड उत्साह, निरलसपणाने कार्य करण्याची त्यांची वृत्ति, त्यांचा दुर्दम्य आशावाद व तरुणांनाहि लाजविणारी त्यांची कार्यतत्परता हीं त्यांच्या स्वभावाचीं व व्यक्तित्वाचीं वैशिष्ट्यें लक्षांत घेतलीं तर त्यांचें देहावसान हें अनपेक्षित असेंच झालें यांत शंका नाही. मराठवाडा साहित्य परिषद् व महाराष्ट्र साहित्य परिषद् यांच्या कार्यात त्यांनी चैतन्य ओतून त्यांना कार्यक्षम केलें ही त्यांची कामगिरी विशेष उल्लेखनीय होय. मराठवाड्यांत व महाराष्ट्राच्या नागपूर, मुंबई, पुणें या इकडील भागांत परिषदेच्या सभासद-नोंदणीसाठी त्यांनी अक्षरशः पायपीट केलेली असल्यामुळे रावसाहेबांना अनेक लोक ओळखीत असत; किंबहुना रावसाहेबांशीं ज्यांची ज्यांचा या नाही त्या कारणांसाठी संबंध आला त्यांना रावसाहेब हे आपल्या कुटुंबांतील एक वडीलधारें माणूसच आहेत असें वाटण्याइतका जिव्हाळा ते आपल्या गोड नि खेळीमेळीच्या वागणुकीने निर्माण करीत. त्यामुळेच त्यांना ओळखणारी प्रत्येक व्यक्ति त्यांच्या निधनाची वार्ता ऐकून अगर वाचून अन्तःकरणांत हळहळल्याखेरीज खचित राहिली नसेल.

रावसाहेब जोशी हे टपाल खात्यांत सनदी नोकर होते. ते सेवानिवृत्त झाले त्या वेळीं ते चांगल्या पगाराच्या व अधिकाराच्या जागेवर होते. त्यांनी आपण व आपलें कुटुंब यांच्या-पुरताच विचार केला असता तर आपल्या सेवा-निवृत्तीच्या वेतनांत ते मोठ्या थाटाने उर्वरित आयुष्य कंठूं शकले असते. पण Service before Self हें टपालखात्याचें ब्रीदवाक्य त्यांच्या रोमरोमीं एवढें भिनलें गेलें होतें की, टपालखात्याची नोकरी संपुष्टांत आल्यावर आपल्या

मर्यादित शक्तींत त्यांनी समाजाची सेवा सुरू केली. त्यांच्या ठिकाणीं अधिकाराचा गर्व अगर अहंभाव नव्हता अगर आपण मोठे व दुसरा लहान ही मनोवृत्ति नव्हती. स्वभाव गोडा, लाघवी व सेवेच्या भावनेमुळे वृत्ति लीन. त्यामुळे डॉ. केतकर यांच्या अध्यक्षतेखाली इ. स. १९३१ सालीं हैद्राबाद येथें भरलेल्या साहित्य संमेलनाचे एक कार्यवाह म्हणून ते साहित्यप्रेमी मंडळींच्या परिचयांत आले व साहित्यप्रेम हाच त्यांच्या पुढील सेवेचा स्थायीभाव ठरला. कारण त्यानंतर ते लगेच पुण्याला येऊन स्थायिक झाले व महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कामाचीं सूत्रें त्यांनी आपल्याकडे घेतलीं; किंबहुना साहित्यसंस्थांची संघटना करण्याच्या त्यांच्या तळमळीमुळे त्यांच्याकडे तीं सोंपविण्यांत आलीं.

ही जबाबदारी त्यांनी उत्साहाने व कांही तरी कर्तृत्व करून दाखविण्याच्या उमेदीने स्वीकारली. ते सहा वर्षे परिषदेचे कार्यवाह होते. या मुदतींत त्यांनी परिषदेच्या कार्यांत चैतन्य निर्माण तर केलेंच, पण परिषदेला सुस्थिरता प्राप्त करून देण्यासाठी गांवोगांवीं हिंडून परिषदेच्या सभासदांची संख्या हजाराच्या वर नेली. याच मुदतींत डॉ. माधवराव पटवर्धनांचें स्मारक करण्यासाठी जे प्रयत्न झाले त्यांतील मोठा भाग त्यांचाच होता. त्या प्रयत्नांतूनच आजचें ' माधवराव पटवर्धन सभागृह ' निर्माण झालें आहे. रावसाहेबांची दुसरी एक मोठी कामगिरी म्हटली म्हणजे जे साहित्यिक अगर लेखक परिषदेच्या कार्याशीं या नाहीं त्या कारणामुळे समरस होत नसत अगर स्पष्टच लिहायचें म्हणजे परिषदेच्या बाबतींत फटकून वागत असत त्यांना त्यांनी परिषदेंत ओढलें, परिषदेच्या कार्यात रस घेण्यास प्रवृत्त केलें. हें करतांना रावसाहेबांना अनेक प्रवृत्तींच्या कार्यकर्त्यांशीं संघर्ष करावा लागला. तसें करतांना त्यांना मनस्तापहि अतोनात झाला; पण केवळ सेवेच्या ब्रीदामुळे विशिष्ट मर्यादेपर्यंत त्यांनी तो सहनहि केला. अर्थात्, परिषदेच्या कार्यांत जो संकुचितपणा आला होता, जी कोंडी निर्माण झाली होती ती दूर करण्याच्या प्रयत्नांत ते यशस्वी झाले. मराठवाडा व नागपूर-विदर्भाकडील साहित्यिकांचे परिषदेबद्दल असलेले खरे-खोटे गैरसमज दूर करून परिषदेच्या कार्यांत त्यांचें सहकार्य संपादन केलें. हें कार्य दिसतें तितकें सोपें नव्हतें. या कार्याचें महत्त्व अनन्यसाधारण आहे. स्वतःचा मोठेपणा विसरून दुसऱ्यांना महत्त्व देण्याच्या सेवावृत्तींतूनच हें कार्य साधलें जातें. महाराष्ट्र साहित्य परिषद् ही सर्वांची आहे व तिच्या हिताचा विचार करणाऱ्या ठिकठिकाणच्या सर्व लहानथोर मंडळींना परिषदेंत स्थान असायला पाहिजे ही समतेची विचारसरणी रावसाहेबांची होती व त्याच हेतूने ते सर्वांशीं मिळतें-जुळतें घेत. त्यांच्या या विचारसरणीचें व कार्यपद्धतीचें महत्त्व सर्वच मंडळींना पटणारें नव्हतें. त्यामुळे विसंवादी सूर निर्माण होत व त्यामुळे रावसाहेब पुष्कळ वेळां वैतागून जात.

साहित्य परिषदेशीं ज्या मुदतींत त्यांचा संबंध आला त्याच मुदतींत रावसाहेबांचा नि माझा परिचय होण्याचा योग आला. नोकरी व साहित्यप्रेम या दोन्हीहि बाबतींत त्यांना माझ्यांत साधर्म्य आढळल्यामुळे, माझ्याबद्दल त्यांना विशेष आपलेपणा वाटूं लागला. मुंबई मराठी साहित्यसंघाशीं असलेला माझा घनिष्ठ संबंधहि त्यांच्या-माझ्यामधील जिव्हाळ्याच्या संबंधांना कारणीभूत झाला असावा. डॉ. भालेराव व आम्हीं सर्व साहित्यप्रेमी कार्यकर्ते यांच्या साहित्यविषयक चळवळींचें रावसाहेब अन्तःकरणपूर्वक कौतुक करीत, त्यांची आस्थापूर्वक विचारपूस करीत. त्यांचा प्रेमळ नि प्रोत्साहनपर हात आमच्या पाठीवरून फिरला म्हणजे आम्हांसहि धन्यता वाटे. रावसाहेबांचीं पत्रें हीं नेहमीं जिव्हाळ्याने ओतप्रोत भरलेलीं असत. त्यांचा हा जिव्हाळा अगर प्रेम हें अगदी निरपेक्ष असे. आपल्याप्रमाणेच इतर ठिकठिकाणचे साहित्यविषयक कार्यकर्ते

आपल्याच ध्येयवादाची परिपूर्ति करण्यासाठी झटत आहेत यांतच त्यांच्या मनाला समाधान वाटे, आनन्द होई. म्हणूनच अशा कार्यकर्त्यांची पाठराखगी ते पदरमोड करूनहि करीत. साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळासाठी जेव्हा मी प्रथम उभा राहिलों त्या वेळीं रावसाहेबांनी माझी शिफारस करण्यासाठी नियामक मंडळाच्या एकूणएक सर्व सभासदांना स्वतःच्या हस्ताक्षरांत पत्रें लिहिलीं होतीं! सुमारें १०० च्यावर सभासदांना ८० च्या घरांत असलेल्या रावसाहेबांनी स्वतःच्या कांपऱ्या हस्ताक्षरांत पत्रें लिहिण्याचा पराक्रम म्हणजे त्यांच्या दुर्दम्य उत्साहाचा व ज्यांना आपलें म्हटलें त्यांना स्वतःच्या खिशांतून पैसे खर्च करूनहि हार्दिक पाठिंबा देण्याच्या निरलस आस्थेचा लेखी पुरावाच होय. एकट्या माझ्याच बाबतींत त्यांनी असें केलें असें नव्हे, तर हैद्राबादचे प्रा. माढेकर अगर श्री. न. शं. पोहनेरकर यांच्याहि बाबतींत त्यांनी याच इतिहासाची पुनरावृत्ति केली.

मराठी भाषा व मराठी वाङ्मय यांच्याबद्दल त्यांना विलक्षण आस्था नि कळकळ वाटे व त्यांची जोपासना, वृद्धि व प्रसार करण्यासाठी जे जे प्रयत्न करणें शक्य आहे ते ते प्रयत्न झाले पाहिजेत असें त्यांना वाटे. त्यांच्या या आस्थेचा नि कळकळीचा आविष्कार जसा साहित्यिक व साहित्यसंस्था यांची सेवा करण्यांत झाला तसाच तो त्यांनी उतारवयांत लिहिलेल्या अनेक कवितारूपाने झाला. ज्या वेळीं ते साहित्यविषयक चळवळींचीं सूत्रें हातीं घेऊन साहित्यसंस्थांना खतपाणी घालीत होते त्या वेळीं त्यांचें सारें वाङ्मयीन कर्तृत्व त्या चळवळींना बाळसें आणण्यांत खर्च होत असे. पण या चळवळींच्या कारभारांतून मुक्त होऊन ते जेव्हा पुन्हा निकाराबादला जाऊन स्थायिक झाले त्या वेळीं त्यांची मराठी वाङ्मया-बद्दलची ही आस्था काव्य-निर्मिति व काव्य-गायन यांच्या वाटे प्रकट होऊं लागली. मराठी भाषा, मराठी वाङ्मय व मराठी संस्कृति यांच्याबद्दलचें त्यांचें प्रेम त्यांच्या अनेक कवितांतून व औरंगाबाद साहित्य संमेलनाच्या उद्घाटनप्रसंगीं केलेल्या आवेशपूर्ण भाषणांतूनहि व्यक्त झालेलें आहे. "मराठी कविता, १९२०-१९५०" या इ. स. १९५० सालीं प्रसिद्ध झालेल्या प्रातिनिधिक काव्यसंग्रहांत रावसाहेबांची 'माझी रांगडी आई' ही कविता संकलित करणें आम्हांस अपरिहार्य झालें ही गोष्टच त्यांच्या काव्यनिर्मितीच्या यशाची प्रतीक म्हटली पाहिजे. बायबलमधील एका कथेवर आधारलेलें ओवीबद्ध खंडकाव्य त्यांनीं लिहायला घेतलें होतें, पण तें पुरें होऊं शकलें नाही.

रावसाहेब गेले पण आपल्या साहित्यसेवेचा आदर्श ठेवून गेले. अनेक व्यक्तींच्या मनांवर आपल्या स्नेहशील व निरलस जीवनक्रमाचे उच्च संस्कार ठेवून ते निघून गेले! नवपरिस्थितांच्या ध्येयवादी व सत्प्रवृत्त जीवनाचरणाचें स्वागत करून त्यांनी जशी त्यांची प्रेमाने पाठ थोपटली तशीच त्यांच्या दृष्टीने वाममार्गी जीवनाची वाटचाल करणाऱ्या आपल्या स्वतःच्या नातलगां-चीहि गय न करतां त्यांनी त्यांची निर्भर्त्सना केलेली मीं पाहिली आहे. त्यांची शिस्त मोठी करडी होती. त्या शिस्तीच्या निकषाला जो टिकला त्याच्यावर त्यांनी उदंड प्रेम केलें. समाज-सेवा असो अगर साहित्य-सेवा असो, सेवकाचें जीवन हें निर्मळ, शिस्तप्रिय व निरलस असल्याशिवाय सामाजिक संस्था अगर साहित्यसंस्था यांचा कारभार सुरळीत चालणार नाही हें त्यांचें अनुभवसिद्ध मत होतें. म्हणूनच रावसाहेबांच्या निधनाने या आदर्श गुणांचा एक थोर प्रतिनिधि नाहीसा झाला याचें दुःख मनाला फार काळ जाणवत राहील. डॉ. भालेरावांच्या नंतर मला जर कोणाच्या निधनाचें विशेष दुःख झालें असेल तर तें रावसाहेब र. लु. जोशी यांच्या निधनाचें. ● ● ●

वा. रा. ढवळे



अनुक्रमणिका

# पत्रव्यवहार

## संतोषमुनि कृष्णदासाचें रुक्मिणी स्वयंवर—सारांश व वाढावा.

संपादक 'म. सा. पत्रिका' यांसी
सप्रेम नमस्कार विनंती विशेष :

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या १२५ व्या अंकांत (एप्रिल–मे–जून १९५८) श्री वसंत स. जोशी यांनी संतोषमुनींनी लिहिलेला रुक्मिणी स्वयंवराचा सारांश, "लघु रुक्मीणी सैंवर" प्रसिद्ध केला आहे. त्याचबरोबर रुक्मिणी स्वयंवराच्या मोठ्या ग्रंथाचीहि थोडी माहिती लिहिली आहे. त्याच विषयावर हें लहानसें टिपण लिहीत आहे.

संतोषमुनीने हा ग्रंथ शके १४७५–७६ मध्ये लिहिला असें महाराष्ट्र सारस्वतांत (पुरवणी पृष्ठ ९३७) म्हटलें आहे. पण तो त्या शकांतला नसून तो १४५६ मधील आहे. संतोषमुनीने "गुरुवार सुध फाल्गुन : द्वीतीये तीथी आनंद दीन : तै श्रीनगरी ग्रंथ जाला संपूर्न : हे रुक्मिनी सैवर देसा : ।। ९५ ।। ऐसा दोनी सत तीन सहस्र ग्रंथ : सीधी पावला माघ मासा एकांत : कवी संतोसमुनी म्हने श्रीकृष्णनाथ : आता प्रीती पावो स्वामी माझा : ।। ९६ ।। या दोन ओव्या मजजवळील हस्तलिखितांत ३१९५ व ३१९६ अशा आहेत. यावरून असें दिसतें की, हा ग्रंथ लिहिण्यास १ महिना लागला. आनंद संवत्सर शके १४१६ व शके १४७६ मध्ये येतो. दिलेली तिथि, वार पिळे जंत्रीप्रमाणे शके १४१६ शीं जमतात. फाल्गुन शुद्ध द्वितीया गुरुवारीं १ घटिका ४४ पळांनंतर सुरू होते. शके १४७६ मध्ये फाल्गुन शु. २ शनिवारीं येते.

मजजवळील हस्तलिखितांत पंचवीस "प्रसंग" आहेत. लघु रुक्मीणी सैंवरांत "अध्याय" म्हटलें आहे व अठावीस अध्यायांचा सारांश आहे. यावरून असें वाटतें की पंचवीस प्रसंगांचें रुक्मिणी स्वयंवर लिहून झाल्यावर पुढे वृद्धापकाळीं त्याच ग्रंथास आगळा वाढवून अठावीस अध्यायांचें एक रुक्मिणीस्वयंवर लिहावें असें संतोषमुनीस वाटलें असावें व त्याकरिता त्याने हें 'लघु रुक्मीणी सैंवर' अनुक्रमणिकावजा व नित्य त्याचें चिंतन करण्यास आधार म्हणून लिहिलें असावें.

अठावीस अध्यायांच्या रुक्मिणी स्वयंवराची रचना साधारणतः खालीलप्रमाणे ठरविलेली दिसते.

रुक्मिणी स्वयंवराच्या कथानकास खरा रंग श्रीकृष्ण कुंडिनपुरास आल्यापासूनच भरतो. त्याला पोषक असा चौदावा प्रसंग आहे. त्याचे दोन भाग पाडून चौदावा व पंधरावा असे दोन अध्याय करण्याचें ठरविलेलें दिसतें. ओवी १४४४ पासून ओवी १६१० पर्यंत श्रीकृष्ण आपल्या परिवारासह मूळ महादेवापासून कुंडिनपुरास कसा आला, त्याच वेळीं शिशुपाल वगैरेंची स्थिति काय झाली होती, त्यांना अपशकुन कसे होत होते वगैरे मजकूर आला असून, ओवी १६१० पासून १६५९ पर्यंत श्रीकृष्णाचें कुंडिनपुरास आगमन, आंबिकेच्या देवळाजवळच मेलीकार, भीमकाचा श्रीकृष्णास आहेर व श्रीकृष्णाचा भीमकास आहेर येथपर्यंत कथानक आलें आहे. येथपर्यंतचा चौदाव्या प्रसंगाचा भाग घेऊन चौदावा अध्याय करण्याचें ठरविलेलें दिसतें. नंतरचा ओवी १६६३ पासून १७०४ पर्यंतच्या उरलेल्या भागाचा पंधरावा अध्याय कल्पिलेला दिसतो. १५ वा प्रसंग तसाच ठेवून त्याचा १६ वा

[ पुढील मजकूर पान ५६ वर पाहा. ]

डॉ. म. गो. माईणकर

# कर्णाची व्यक्तिरेखा

महाभारतांतील सर्व व्यक्तिरेखांमध्ये कर्णाची व्यक्तिरेखा मोठी विलक्षण रंगविलेली आहे. धर्म, भीम, अर्जुन, दुर्योधन व श्रीकृष्ण या सर्वांच्या व्यक्तिरेखांपेक्षा कर्णाची व्यक्तिरेखा ही अधिक सुंदर, कलात्मक व परिणामकारक आहे असें वाटून जातें. उत्कृष्ट शोकांतिकेचीं सारीं बीजें कर्णकथेंत सामावलेलीं आहेत. वर उल्लेखिलेल्या सर्व पात्रांची उदात्तता व महनीयता हीं कर्णाच्या वांट्याला आलेलीं आहेत; परंतु त्याला या सर्वांपेक्षा वेगळ्या व अगदी विलक्षण परिस्थितींतून जावें लागलें आहे व म्हणून त्याची भीषण शोकांतिका झालेली आहे. हर्षामर्षांच्या विविध प्रसंगांनी भरलेलें महाभारत वाचून झाल्यानंतर सूर्यपुत्र असून सूतपुत्र म्हणून वारंवार अधिक्षेप झालेल्या, औदार्याच्या उन्मादांत परिस्थितीची जाणीव होऊनहि इंद्रास आपलीं कवचकुंडलें काढून देणाऱ्या, स्वतः पहिला पांडव असून पांडवांच्या जिवावर उठणाऱ्या, राजमाता कुंतीसारखी माता असून मातृसुखास मुकलेल्या, मित्रप्रेमास जागणाऱ्या उदात्त व पराक्रमी कर्णाची मूर्ति डोळ्यासमोरून दूर होत नाही. या कर्णाचें जीवन जसें विलक्षण घटनांनी भरलेलें आहे तसाच त्याचा शेवटहि डोळ्यांत अश्रु उभे करणारा आहे. परशुरामाचा शाप आणि ब्राह्मणाचा शाप या दोहोंना त्याचा बळी पडलेला आहे. ही अशी असामान्य व्यक्तिरेखा प्रतिभावंत कलावंतांना आकर्षक वाटली नाही तरच नवल !

## भासाचा कर्ण

संस्कृत नाटककार भासाने कर्णाच्या अनुपम औदार्यावरच आपलें लक्ष केंद्रित करून 'कर्णभार' नाटक लिहिलें आहे. कृष्णाच्या कपटाची कल्पना येऊनहि याचक ब्राह्मणाला आपलीं कवचकुंडलें काढून देणारा कर्ण त्याने नायक म्हणून रंगविला आहे. या आपल्या कलाकृतींत एकाच उत्कट प्रसंगावर सारें कथानक आधारून त्याने उदार कर्णाची शोकांतिका ठसठशीतपणें रंगविली आहे. महान् व्यक्तींच्या अंगच्या सद्गुणांच्या अतिरेकामुळे ओढवणारा नाश हें शोकांतिकेचें स्वरूप होय आणि या दृष्टीने पाहिल्यास 'कर्णभार' या नाटकास उत्कृष्ट शोकांतिका म्हणावें लागेल. सरळ व उमद्या स्वभावाचा कर्ण आपल्या औदार्याच्या व कीर्तीच्या अभि-निवेशाने अभेद्य अशा कवचकुंडलांचा त्याग करीत आहे हें पाहिल्यावर मन गहिंवरून जातें. याचक ब्राह्मणाने कवचकुंडलें मागावींत यांत कृष्णाचें कपट असावें अशी शंका त्याला स्पर्श करून जाते. त्या ब्राह्मणाच्या आशीर्वादाचें मर्महि तो जाणतो व त्यांत त्याला स्वतःच्या परा-भवाची चाहूल लागते; तथापि त्या ब्राह्मणाच्या 'नेच्छामि, नेच्छामि' ने त्याच्या औदार्याला चढतें आव्हान मिळतें व त्याचें दान सहस्र गाई, सहस्र घोडे, हत्ती, कनक, पृथिवी, अग्निष्टोम-फळ, स्वतःचें मस्तक या क्रमाने वाढत जातें. शेवटीं शल्याच्या सूचनेकडे दुर्लक्ष करून तो कवचकुंडलांना पारखा होतो व सूर्यपुत्र कर्ण अर्जुनाच्या शरांकरिता उघडा पडतो. सुरवाती-पासूनच निर्वीर्य अस्त्रें, अडखळणारे घोडे, निःशब्द शंखदुंदुभि, परशुरामाच्या शापाची कथा या साऱ्यांनी कारुण्याचें वातावरण निर्माण केलें आहे. आपण 'विप्रेन्द्रपादरजसा पवित्रमौली' आहोंत याचा कर्णाला यथार्थ अभिमान आहे व 'हुतं च दत्तं च तथैव तिष्ठति' अशी त्याची

जीवनश्रद्धा आहे; व म्हणूनच शेवटींसुद्धा 'शक्रः खलु मया वञ्चितः' कारण आपण त्याला 'कृतार्थ' केलें आहे असें उदात्त समाधानच त्याला वाटत आहे. भासाने आपल्या आकाराने लहान पण गुणांनी महान् अशा या नाटकांत उदार कर्णाची करुणरम्य अशी अविस्मरणीय व्यक्तिरेखा काढली आहे.

### भट्टनारायणाचा कर्ण

भट्टनारायण हा कर्णाच्या व्यक्तिरेखेला हात घालणारा दुसरा संस्कृत नाटककार होय. त्याने आपल्या 'वेणीसंहार' नाटकांत तिसऱ्या अंकांत द्रोणवधानंतर अश्वत्थामा व कर्ण यांच्यामध्ये झालेल्या कलहाचें चित्रण केलेलें आहे. या अंकांतील कर्ण पराक्रमी वाटतो परंतु स्पृहणीय वाटत नाही. महाभारतामध्ये कांही प्रसंगीं कर्ण हा मनाचा क्षुद्र व जिभेचा तिखट असा दाखविलेला आहे. सभापर्वामध्ये ज्या तऱ्हेने तो द्रौपदीशीं बोलतो व तिला सल्ला देतो तें ध्यानांत आणलें म्हणजे झालें. मत्स्यभेदप्रसंगीं द्रौपदीने त्याचा पाणउतारा करून तेजोभंग केलेला आहे हें स्मरूनहि कर्णाच्या या भाषणाचें समर्थन करणें अवघड वाटतें. भट्टनारायणाने कर्णाचा पराक्रम व मित्रप्रेम हे दोन गुण आणि औद्धत्य व सतत 'सूतपुत्र' असा अधिक्षेप झाल्यामुळे हृदयांत स्थिर झालेला कडवटपणा व त्यामुळे आलेला जिभेचा तिखटपणा हे तीन अवगुण यांवर आपली कर्णाची व्यक्तिरेखा आधारलेली आहे. भट्टनारायणाच्या कर्णाला भीष्माविषयी आदर नाही, द्रोणाविषयी प्रेम नाही, व शोकविकल अश्वत्थाम्याविषयी सहानुभूति पण नाही. अश्वत्थाम्याच्या शस्त्रत्यागप्रसंगीं कर्णाने केलेला द्रोणांच्या शस्त्रत्यागाचा उल्लेख ज्या वृत्तीने केलेला आहे ती वृत्ति उद्वेगजनक वाटण्यासारखी आहे. द्रोणाचार्यांना त्यांच्या निधनानंतर 'पाञ्चालभीत' असें म्हणून उपरोधाने त्यांना 'विक्रमैकरस' असें त्याने म्हटलें आहे. अश्वत्थाम्यास त्यांना राज्य द्यावयाचें होतें असा त्यांच्यावर स्वार्थी हेतूचा आरोप त्याने केला आहे व त्यांनी 'प्रधान-पुरुषवधाची' जाणूनबुजून उपेक्षा केली असेंहि दुर्योधनास सुचविण्यास त्याने कमी केलेलें नाही. हा कर्ण गुरुजनांविषयी आदर न बाळगणारा, त्यांच्या करुणास्पद निधनानंतरहि त्यांचा अधिक्षेप करण्यास मागेपुढे न पाहणारा, वढाईखोर व स्वतःच्या पराक्रमाविषयी विलक्षण विश्वास बाळगणारा असा आहे. अश्वत्थाम्याने त्याला म्हटलेलें 'दुरात्मन्, राजवल्लभ, प्रगल्भ, असंबद्ध-प्रलापिन्' हें सारें योग्यच वाटून जातें. आपल्या नाट्यप्रयोजनाच्या दृष्टीने अश्वत्थाम्याशीं भांडणारा व शस्त्रत्याग करावयास लावणारा कर्ण भट्टनारायणास हवा होता व म्हणून त्याने त्याला वीररस व उपरोध यांनी ओथंबिलेली भाषा दिली. कर्णाच्या जीवनांतील शोकांतिका हा त्याचा विषय नाहीच. भासाच्या कर्णाची महनीयता व विलोभनीयता भट्टनारायणाच्या कर्णाला मुळींच लाभलेली नाहीत. त्याने 'प्रगल्भ' कर्णाचें दर्शन आपणांस घडविलें असें म्हणावयास हरकत नाही.

### शिवरामपंतांचा कर्ण

भासाने कर्णचरित्रांतील एक प्रसंग आपल्या शोकांतिकेकरिता निवडला आहे तर भट्टनारायणाने एका प्रसंगापुरताच कर्णाला आपल्या नाटकांत आणिलेला आहे. कर्णाचें संपूर्ण जीवन हा दोघांचाहि विषय नाही. परंतु शिवरामपंतांनी मात्र सर्व कर्णचरित्रावर आपलें 'पहिला पांडव' हें नाटक लिहिलें आहे. स्वतः 'पहिला पांडव', 'कुन्तीपुत्र' व 'सूर्यपुत्र' असूनहि कर्ण जन्मभर "कौरवपक्षपाती अंगराज, राधेय व सूतपुत्र"च राहिला. नियतीने त्याला कौरवांच्या पक्षांत टाकिलें व म्हणूनच भारतीय युद्ध झालें. कर्णाचें जन्मरहस्य हें रहस्य राहिलें नसतें तर सारी कथा कांही वेगळीच झाली असती. पंतांना या रहस्याला व कर्णाच्या पांडवांमधील स्थानाला महत्त्व द्यायचें आहे हें नाटकाच्या नांवावरूनच उघड होतें.

शिवरामपंतांना उपरोध प्रिय व म्हणूनच नियतीचा हा त्या महान् पुरुषावरील उपरोध त्यांना आकर्षक वाटला असावा. कर्णाच्या 'दैवाचा विचित्र खेळ' त्यांना कलाविषय म्हणून स्वीकारावासा वाटला. या नाटकाच्या पहिल्या अंकांत कर्ण हा सत्यप्रिय व गुरुभक्त असा आपणांस आढळतो. त्याला मातेची ओढ आहे व म्हणून जन्मरहस्य कळल्यावर अभिषेका-नंतरहि संध्याकाळीं कुंतीकरिता बुरख्याचा रथ पाठविण्याचें तो ठरवितो व तिला अर्जुनाशीं युद्ध सुरू न करण्याचें वचन देतो. द्रोणवधाचा सूड त्याला घ्यावासा वाटतो व त्यांच्या रक्ताचें दर्शन त्याला असह्य होतें. या संदर्भात वर सांगितलेली भट्टनारायणाच्या कर्णाची वृत्ति ध्यानांत आणल्यास या दोन व्यक्तिरेखांमधील फरक चांगला ध्यानांत येईल. दुसऱ्या अंकांत दुर्योधनाला कर्णाच्याच निष्ठेबद्दल शंका आल्याचें दर्शविलें आहे. शिवरामपंतांनी सुकांता, कर्ण व वृषसेन यांच्या प्रवेशांत कर्णाचें कौटुंबिक जीवन रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे व प्रेमळ पति व पिता या स्वरूपांत तो दाखविला आहे. कुंती व कर्ण यांच्या प्रवेशांत तो कमालीचा मृदु व हळवा असा वाटतो. कर्ण व शल्य यांच्या प्रवेशांतसुद्धा कर्णाची परिचित मर्मभेदी वाणी व पराक्रमाचा अहंकार हीं अभावानेच जाणवतात. शेवटचा कर्णाच्या मृत्यूचा प्रवेश परिणामाच्या दृष्टीने लांबलेला वाटतो व कर्णाची 'कृष्णभक्ति' तर विस्मयच उत्पन्न करिते. या कुंतीकर्णकथानकाचा विकास फार शांत व संथरीतीने झाला आहे व मध्ये येणाऱ्या गौण पात्रांच्या विनोदी प्रवेशांमुळे कारुण्याचा किंवा वीररसाचा नीट परिपोषहि साधलेला नाही असें सारखें वाटत राहतें. कशाचीच उत्कटतेने प्रतीति येत नाही. वास्तविकरीत्या माता मिळाल्यामुळे, ती कुंतीच निघाल्यामुळे विकल असा कर्ण व केवळ वचनबद्ध म्हणूनच नव्हे तर सर्व जीवनभरची ईर्षा म्हणून अर्जुनास मारण्याची प्रतिज्ञा केलेला महाप्रतापी कर्ण यांचा संघर्ष चित्रित व्हावयास हवा होता. शिवरामपंतांचा कर्ण त्या मानाने शांत आहे. येथे भावनांचें वादळ नाही, आत्मश्लाघेची गर्जनाहि नाही. गुरुभक्त, मातृभक्त व कृष्णभक्त असें कांही या कर्णाचें स्वरूप वेगळेंच आहे. शिवरामपंतांनी महाभारत आधार मानिलें खरें, पण या कर्णचित्रांत कांही निराळेच रंग भरले हेंहि तितकेंच खरें. त्यांनी 'भक्त कर्णा'चें दर्शन आपणांस घडविलें असें म्हणावयास हरकत नाही.

## औंधकरांचा कर्ण

औंधकरांनी आपला 'महारथी कर्ण' शिवरामपंतांचा मागोवा घेऊनच निर्माण केल्याचा भास होतो. जन्मरहस्य हाच विषय नाटकांत सारखा खेळविला आहे. कुंती कर्णाच्या अभिषेकप्रसंगींच उपस्थित होते. पुढे तिची व राधेची भेट होते. कर्णाला जन्म-रहस्य कळल्यावर त्याच्या मनांत भावनांचा क्षोभ झाल्याचें दाखविलें आहे. कुंतीविषयी त्याला एकप्रकारची चीड येते. आतांपर्यंतच्या आलेल्या कडवट अनुभूति व हा मातृलाभ यांची नीट सांगड बसूं शकत नाही. त्वेष, चीड हीं या कर्णांत दिसून येतात, तथापि त्या मानाने कुंतीस प्राधान्य अधिक मिळालेलें आहे. तसेंच कृष्ण व शकुनि यांच्या कारस्थानाच्या कथानकामुळे कुंतीकर्ण-कथानक थोडें मागे पडल्यासारखें वाटतें. शेवटचा मृत्यूचा प्रसंगहि उत्कट कारुण्याने भरलेला असा उतरला नाही. यापूर्वी ऐतिहासिक नाटकें हाताळल्याचा परिणाम या नाटकांतील कथानक-रचनेवर व भाषेवर दिसून येतो. हा कर्ण दर्पयुक्त व प्रमाथी भावनांचा असा वाटतो; पण महाभारतांतील भव्य कर्ण प्रतीत होत नाही असेंच वाटतें. श्रीकृष्णाला सर्व कथानकांत मिळालेलें प्राधान्य पाहतां सौभद्राच्या परंपरेंतच आपण वावरत आहों असा भास होतो. यामुळेहि कर्णाला गौणत्व आलेलें आहे. शिवरामपंतांनी व औंधकरांनी

कर्णाच्या जीवनाचा शेवट दाखविला खरा, पण त्याची शोकांतिका मात्र त्यांना प्रभावकारक रीतीने चित्रित करतां आली नाही असेंच म्हणावें लागेल. या दोन्ही नाटकांत तेजोभंग झालेल्या, अपमानित, अर्जुनाच्या प्रतिस्पर्ध्याची, महापराक्रमी कर्णाची व्यक्तिरेखा मागे पडून 'जन्मरहस्या 'ला प्राधान्य मिळालेलें आहे.

## शिरवाडकरांचा ( कुसुमाग्रजांचा ) कर्ण

हा तर बोलूनचालून 'कौंतेय'. साहजिकच या नाटकांतहि कुंतीकर्णकथानकाला प्राधान्य मिळालें आहे. सुरवातीलाच कुसुमाग्रजांनी सांगून टाकिलें आहे, 'पहिल्या बाजीरावाप्रमाणेच कर्णाच्या चरित्रांतील शोकांत नाट्याचेंहि गाढ आकर्षण मला कित्येक वर्षांपासून वाटत आलें आहे. त्या आकर्षणांतूनच या नाटकाचा जन्म झाला आहे.' 'कर्ण व कुंती यांच्यांतील संबंधाचें सूत्र घेऊन त्यावरतीच नाटकाची उभारणी करण्यांत आली आहे.' भासानंतर प्रभावाने असा कर्ण कुसुमाग्रजांनीच रंगविला असें म्हणण्याचा मोह होतो. हा कर्ण महापराक्रमी आहे. मातृसुखाकरिता आसुसलेला आहे. त्याच्या सेनापतिपदाला त्याच्या हीन जातीमुळे नाट लागलेला आहे. कुंती माता मिळूनहि त्याचें 'भावजीवन उद्ध्वस्त' झालें आहे. त्याच्या प्रत्येक वाक्यांत त्याचा कडवटपणा, आत्मविश्वास व पराक्रमाबद्दलचा यथार्थ अहंकार स्वच्छ दिसून येतात. पहिल्या अंकांत त्याने आपल्या विरोधकांना दिलेलें उत्तर व कुंती आपली आई आहे हें कळल्यावर तिच्यावर केलेला भडिमार या संदर्भांत उल्लेखनीय आहेत. त्याचप्रमाणें माधवीशीं व कुंतीशीं केलेल्या संवादांतून हळुवारपणाहि दिसून येतो. कर्णाच्या मनांतील भावसंघर्ष उत्कटतेने चित्रित झाला आहे व शेवटहि कारुण्यपूर्ण असा आहे. मनांतील तीव्र भावना शब्दांत वठविण्याचें सामर्थ्य, नाट्योपरोध, अंकांची कौशल्यपूर्ण रचना, मनावर परिणाम करणारे कर्णाच्या पांडवशिबिरांतील प्रवेशासारखे प्रसंग या साऱ्यांनी एक विलक्षण असा एकसंध परिणाम मनावर होतो. तंत्रदृष्ट्या 'पाहिला पांडव, महारथी कर्ण व कौंतेय' या नाटकांचा तौलनिक अभ्यास मनोरंजक व उद्बोधक आहे. कौरव व पांडव यांचा झगडा हा 'प्रतिष्ठित व अप्रतिष्ठित यांच्यांतील लढा' करून कुसुमाग्रजांनी त्याला वेगळेंच स्वरूप दिलें आहे. साहजिकच 'प्रतिष्ठितांच्या' कौरवसैन्यांत 'रथकाराच्या हीन जमातींत' जन्म पावलेल्या कर्णाला सेनापतिपद सहजासहजीं व अविरोध असें मिळूं शकत नाही. त्याच्या अंगचे 'मोठेपणा, शौर्य, सामर्थ्य व निष्ठा' हे गुण मान्य असूनहि क्षत्रिय राजे शल्याच्या मुखाने विरोध करतात. या कर्णाच्या 'ललाटावर दुर्दैवाची तप्तमुद्रा' मारलेली आहे. तो केवळ शस्त्राने लढूं शकत नाही. त्याचीं 'शस्त्रं मित्रांच्या सेवेसाठी आणि वैऱ्यांच्या रक्तासाठी हपापलेलीं आहेत.' मातृसुखाची त्याची ओढ 'तिला माझा हा गौरव पाहून किती आनंद वाटला असता ! रथावर आरूढ होतांना तिच्या पायावर डोकं ठेवून मी तिचे आशीर्वाद घेतले असते' या वाक्यांत स्वच्छ दिसते. कुंतीला पाहिल्यावर 'मातृत्वाच्या भावनेची मंगल उदासीन मूर्तीच' समोर उभी राहिल्याचा भास होतो. 'आई म्हणून कोणाला हाक मारायची तर याच स्त्रीला हाक मारावी' असं त्याला वाटतं. भारतांतील सारीं राज्यं बेचिराख करण्याचं सामर्थ्य आपल्या मनगटांत आहे याची त्याला जाणीव आहे. त्याच्या वैराण आयुष्यांत त्याच्यासाठी निःस्वार्थीपणाने डोळे ओले झालेले पाहण्याचं भाग्य त्याला लाभलेलं नाही. यशस्वी जीवनांतहि त्याला आपल्यांतील माणुसकी जाते आहे असं वाटतं व 'जें मिळवलं त्यापेक्षा जें हरवलं तें फार मोलाचं होतं' अशी जाणीव त्याला झालेली आहे. 'प्रतिज्ञाभंगापेक्षा याचकाला विमुख पाठविण्याचं दुःख त्याला अधिक आहे' व म्हणून

कुंतीने मागितल्यास पांडवांचे जीवदानहि देण्यास तो तयार आहे. सेनापतिपद मिळाल्यावर तो अंतिम विजयाच्या वेशीवर उभा आहे व त्याच्या अंतिम गौरवाचा दिवस उजाडणार आहे अशी त्याची श्रद्धा आहे. बंधुद्रोह व मित्रद्रोह यांच्या द्वंद्वांत तो सापडला आहे. मुलाचं अंतःकरण घेऊन तो कुंतीकडे जातो. तिचा आशीर्वाद घ्यावयास तो आला आहे पण अर्जुनवधाची ईर्षा मनांतून गेलेली नाही. कुसुमाग्रजांनी कर्णाची भव्यता परिणामकारक रीतीने चित्रित केली आहे व त्याच्या शोकांतिकेतून 'एका मानवाच्या दुर्दैवाच्या भयानक विलासाचे' दर्शन घडविलें आहे. 'पहिला पांडव, महारथी कर्ण' यांचें स्मरण करून देणारे प्रसंग येथे आहेत, पण त्या प्रसंगांच्या मांडणीचें कौशल्य वेगळेंच आहे. कुसुमाग्रजांनी करुणरम्य कर्णाचें दर्शन आपणांस घडविलें आहे यांत शंका नाही.

या संदर्भात कविवर्य रवींद्रनाथांच्या कर्णकुंतीसंवादाची व कैलासम् यांच्या Brahmin's Curse या कर्णविषयक कलाकृतींची आठवण होणें अपरिहार्य आहे. रवीन्द्रांचें अप्रतिम काव्य व कर्णकुंती यांच्या कोमल व पवित्र भावनांचा आविष्कार केवळ अवर्णनीय आहेत. कैलासम् यांनी कर्णाच्या महनीयतेवर लक्ष केंद्रित केलेलें आहे. भासाचा 'उदार कर्ण', भट्टनारायणाचा 'प्रगल्भ कर्ण', शिवरामपंतांचा 'भक्त कर्ण', कुसुमाग्रजांचा 'करुण कर्ण', रवींद्रांचा 'त्यक्त कर्ण' हीं सारीं महाभारतांतील विविध रंगांनी नटलेल्या भव्य कर्णाचीं मनोरम छायाचित्रें होत. ● ● ●

# नवीन सभासद

### साधारण

१. श्री. हरी अनंत केतकर, पुणें.
२. श्री. प्रल्हाद निंबराज सातभाई, पुणें २.
३. सौ. प्रमिलाबाई पिंगळे, पुणें २.
४. श्री. मधु कुलकर्णी, इस्लामपूर, (द. सातारा).
५. श्री. बिंदुमाधव आत्माराम कुलकर्णी, सांगली.
६. श्री. सुधाकर ज्ञानेश्वर अनवलीकर, पुणें २.
७. श्री. जगन्नाथ महादेव डोंबाळी, पुणें २.
८. श्री. रामचंद्र केशव अभंग, पुणें २.
९. श्री. अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ, पुणें २.
१०. प्रा. ना. र. इनामदार, पुणें १.
११. श्री. अनंत गोपाळ गोखले, पुणें २.
१२. श्री. माधव खंडेराव भाटे, पुणें २.
१३. प्रा. व. कृ. वऱ्हाडपांडे, नागपूर.
१४. श्री. बलदेवसिंग इंद्रसिंग ग्रेवाल, मुंबई १६.
१५. डॉ. सुमतीबाई क्षेत्रमाडे, कोल्हापूर.
१६. श्री. वसंत र. पंडित, कोल्हापूर.
१७. श्री. वसंत दत्ताजीराव दळवी, कोल्हापूर.

अनुक्रमणिका

प्रा. म. म. वा. वि. मिराशी

# रामगड हा मेघदूतांतील रामगिरि नव्हे

कविकुलगुरु कालिदासाच्या मेघदूत काव्यांत अलकेंतून निर्वासित झाल्यावर यक्षाने ज्या रामगिरीवर कांही काळ वास्तव्य केलें असें वर्णिलें आहे तो पर्वत कोणता, याविषयी विद्वानांमध्ये वाद माजून राहिला आहे. मेघदूताचे वल्लभदेव व मल्लिनाथ हे टीकाकार रामगिरि हा चित्रकूट होय, असें म्हणतात. भगवान् रामचंद्रांचें चित्रकूटास कांही काळ वास्तव्य होतें, असें रामायणांत वर्णिलें असल्यामुळेच संस्कृत टीकाकारांनी रामगिरि म्हणजे चित्रकूट असें म्हटलें असावें, हें उघड आहे. हा चित्रकूट बांदा जिल्ह्यांतील कामताजवळचा तन्नामक पर्वत होय. प्रयागच्या नैर्ऋत्येस मध्य-रेल्वेच्या बांदा-माणिकपूर फाट्यावर चित्रकूट स्टेशन लागतें. तेथून साडेतीन मैलांवर हा पर्वत आहे. पुण्यक्षेत्र म्हणून याची अद्यापि ख्याति आहे. पण मेघदूतांतील रामगिरीच्या भौगोलिक स्थितीचें वर्णन या चित्रकूटास जुळत नाही. कारण त्या वर्णनाप्रमाणे रामगिरि नर्मदेच्या दक्षिणेस होता, तर हा चित्रकूट त्या नदीच्या कित्येक मैल उत्तरेस आहे. तेव्हा हा चित्रकूट म्हणजे रामगिरि हें मत ग्राह्य वाटत नाही. अलीकडे श्री. वा. कृ. परांजपे यांच्या ‘ मेघदूतावर नवा प्रकाश ’ या ग्रंथांत चित्रकूट हा मध्यप्रदेशांतील पूर्वीच्या सिरगुजा संस्थानांतील रामगड व तोच मेघदूतांतील रामगिरि होय, असें आग्रहाने प्रतिपादिलें आहे. त्या मताचें परीक्षण पुढे करूं.

## रामगिरि म्हणजे रामटेक

दुसरें मत रामगिरि म्हणजे नागपूरपासून सुमारें २७ मैलांवर असलेलें रामटेक हें होय. हें मत सुमारें दीडशें वर्षांपूर्वी होरेस हेमन विल्सन् या आंग्ल पंडिताने मेघदूताच्या आवृत्तीला जोडलेल्या टिप्पणींत प्रथम प्रतिपादिलें. हेंच मत सर्वांत सयुक्तिक आहे, हें आम्हीं सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलेल्या ‘ कालिदास ’ या ग्रंथांत दाखविलें होतें. नंतर सुमारें दहा वर्षांनी भारतांत सर्वत्र विक्रमद्विसहस्राब्दीचा उत्सव झाला त्या प्रसंगाने या प्रश्नाची सविस्तर चर्चा ‘ सह्याद्रि ’ मासिकाच्या एप्रिल १९४४—च्या अंकांत केली होती ( संशोधन-मुक्तावली, सर पहिला, पृ. ५३—६४ ). या मताला उपोद्बलक असा पुरावा दिवसानुदिवस जास्त-जास्त उपलब्ध होत आहे. कालिदास गुप्तसम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य याच्या आश्रयास होता, हें मत आता बहुतेक विद्वानांस मान्य झालें आहे. या चन्द्रगुप्ताने आपली प्रभावतीगुप्ता नामक कन्या वाकाटक राजकुमार द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. पुढे गादीवर आल्यावर लौकरच या रुद्रसेनाचा अंत झाला. त्या वेळीं त्याला दिवाकरसेन व दामोदरसेन नामक दोन पुत्र होते. त्यांपैकी दिवाकरसेन या वडील पुत्राच्या नांवाने प्रभावती-गुप्तेने निदान तेरा वर्षे राज्यकारभार पाहिला. तिला मदत करण्याकरिता चंद्रगुप्ताने आपल्या पदरचे अनेक विश्वासू अधिकारी व मुत्सद्दी विदर्भात पाठविले होते. त्यांमध्ये कालिदास असावा. वाकाटकांची त्या वेळची राजधानी नागपूरपासून सुमारें २५ मैलांवर नन्दिवर्धन येथे होती. त्याच्यापासून तीन मैलांवर रामटेक आहे. तेंच प्राचीन रामगिरि. तेथे त्या काळीं भगवान् रामचंद्राच्या पादुकांची पूजा होत असे. प्रभावतीगुप्तेचा एक ताम्रपट रामगिरि-स्वामीच्या ( अर्थात् श्रीरामचंद्राच्या ) पादमूलांजवळ ( पादुकांजवळ ) दिला होता ( ऋद्ध-

अनुक्रमणिका

पूरताम्रपटांतील 'रामगिरिस्वामिनः पादमूलात्' हा निर्देश पहा). मेघदूतांतील 'वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरङ्कितं मेखलासु' हें रामगिरीचें वर्णन असेंच आहे. रामटेक हें फार प्राचीन काळापासून पुण्यक्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. तेराव्या शतकांतील रामदेवराव यादवाच्या काळचा शिलालेख रामटेकवरील लक्ष्मणाच्या देवळांत अद्यापि भग्न स्थितींत विद्यमान आहे. त्यांत त्या पर्वताला 'रामगिरि' असेंच म्हटलें आहे. पुढील श्लोक पहा—

आस्ते धर्मेश्वरो नित्यं स रामस्य गिराविह ।
पीडितं कालिना धर्मं यः कृपालुरपालयत् ॥

यांत रामटेकवरील एका देवालयांतील धर्मेश्वराचें वर्णन आहे (सरदेसाई–स्मारक ग्रंथांतील आमचा 'रामटेक येथील रामदेवराव यादवाच्या काळचा शिलालेख' हा लेख पहा. पृ. १२८ व १३३).

## कालिदासाचें विदर्भांत वास्तव्य

नन्दिवर्धनास असतांना कालिदास रामटेकास अनेकदा गेला असावा. तेथे त्याला मेघदूताची कल्पना सुचली, असें दिसतें. त्याने तें काव्य विदर्भांतच लिहून पुरें केलें असावें. रामगिरीपासून विदिशेपर्यंतचा मेघदूतांत वर्णिलेला मार्ग रामटेकला तंतोतंत जुळतो (संशोधन-मुक्तावली, सर १, पृ. ५९–६१). त्यावरूनहि 'रामटेक हाच रामगिरि' हें मत बरोबर दिसतें. याला उपोद्बलक असें दुसरेंहि एक प्रमाण आहे. प्रभावतीगुप्तेचा दुसरा मुलगा दामोदर-सेन ऊर्फ प्रवरसेन याने रचलेलें सेतुबन्ध किंवा रावणवहो हें प्राकृत काव्य 'महाराजाधिराज विक्रमादित्याच्या आज्ञेने महाराज प्रवरसेनाकरिता कालिदासाने रचलें' अशी आख्यायिका त्या काव्याच्या एका प्राचीन टीकाकाराने दिली आहे. द्वितीय चन्द्रगुप्त, प्रवरसेन आणि कालिदास यांचा संबंध लक्षांत घेतां तींत बरेंचसें तथ्य असावें, असें वाटतें. कालिदासाने हें सर्व काव्य स्वतः रचलें नसलें तरी प्रवरसेनाला तें रचण्यांत मदत केली असावी, असें अनुमान करण्यास त्या काव्यांत पुरावा आहे (आमचा 'वाकाटक-नृपति आणि त्यांचा काळ', पृ. १२१–१२४ पहा). या काव्याकरिताहि कालिदास कांहीं काळ विदर्भांत राहिला असावा.

वर संक्षित रीतीने दिलेल्या प्रमाणांवरून नागपूरजवळचें रामटेक हाच प्राचीन रामगिरि हेंच मत सयुक्तिक आहे, हें दिसून येईल. वरील प्रमाणें पटल्यामुळेच मेघदूतावरच्या बहुधा सर्व पुस्तकांत नागपूरजवळचें रामटेक हाच रामगिरि असें मेघमार्गाच्या नकाशांत दाखविलेलें असतें. या ऐकमत्याचें श्री. वा. कृ. परांजपे यांस वैषम्य वाटून त्यांनीं मध्य-प्रदेशाच्या पूर्वीच्या सिरगुजा संस्थानांतील रामगड पर्वतास रामटेकचा प्रतिस्पर्धी म्हणून उभें केलें आहे. त्यांनी रामटेक म्हणजे रामगिरि या आमच्या मतावर कांहीं आक्षेप घेतले आहेत, त्यांचा विचार पुढे एखाद्या प्रसंगीं करूं. प्रस्तुत लेखांत रामगड हाच चित्रकूट आणि तोच रामगिरि असें सिद्ध करण्याकरिता श्री. परांजपे यांनी 'मेघदूतावर नवा प्रकाश' या ग्रंथांत जीं प्रमाणें मांडलीं आहेत, त्यांचें परीक्षण करावयाचें आहे.

## श्री. परांजपे यांचे नवीन सिद्धान्त

श्री. परांजपे यांच्या सिद्धान्ताचे दोन भाग पडतात — (१) रामगड हाच रामगिरि आणि (२) रामगड हाच रामायणांत वर्णिलेला चित्रकूट. या दोन्ही भागांचें यथाक्रम परीक्षण करूं. हें परीक्षण करतांना आम्हांस श्री. परांजपे यांच्या वादपद्धतीचा अवलंब करावयाचा नाही. श्री. परांजपे हे वकील आहेत. तेव्हा त्यांच्या विवेचनांत सामान्यतः वकील आपल्या

अशिलाच्या बचावाकरिता जी वादपद्धति व जे डावपेच अवलंबितात ते दिसत असल्यास नवल नाही. त्यांच्या विवेचनांत शब्दावडंबर, प्रतिपक्षाला कोपरखळ्या, त्याची कुचेष्टा, सत्यापलाप आणि असत्यसूचन (suppressio veri and suggestio falsi) इत्यादि प्रकार सर्वत्र आढळतात. आम्हांस या पद्धतीने वाद करावयाचा नाही. केवळ सत्यान्वेषणासाठी विवाद्य विषयाचें सप्रमाण विवेचन करावयाचें आहे.

### रामगड हाच रामगिरि याविषयी प्रमाणें

मध्यप्रदेशांतील पूर्वीच्या सिरगुजा संस्थानांतील रामगड हाच रामगिरि हें सिद्ध करण्याकरिता श्री. परांजपे यांनी पुढील प्रमाणें मांडलीं आहेत —

" रामगड हा उंच शिखरांनी मंडित असा एक भव्य व उत्तुंग पर्वत आहे. त्याची एकूण उंची ३२०२ फूट आहे. माथ्यावर या पर्वताच्या पोटांत एक विस्तीर्ण आणि लांबच लांब गुहा आहे. तिला हाथीफोड म्हणतात. याच गुहेंत हनुमान् वगैरे वानरवीर सीताशोधार्थ आले होते, असें रामायणांतील खालील श्लोकांत वर्णिलें आहे —

दुर्गं ऋक्षबिलं नाम दानवेनाभिरक्षितम् ।
अवकीर्णं लतावृक्षैर्ददृशुस्ते महाबिलम् ।।

(किष्किंधाकांड, ५०-८)

यावरून या स्थळीं किंवा याच्या आसपास राम व सीता पूर्वी राहत असावे. पूर्वीच्या वास्तवस्थळीं शोध करणें ही गोष्ट स्वाभाविक व अनुभवसिद्ध आहे. या विवराला ऋक्षबिल म्हटलें आहे. कालिदासाने चित्रकूट पर्वत ऋक्ष पर्वताच्या परिसरांत होता, असें खालील श्लोकांत सांगितलें आहे —

रामस्त्वासन्नदेशत्वाद् भरतागमनं पुनः ।
आशङ्क्योत्सुकसारङ्गां चित्रकूटस्थलीं जहौ ।।
प्रययावातिथेयेषु वसन् ऋषिकुलेषु सः ।
दक्षिणां दिशमृक्षेषु वार्षिकेष्विव भास्करः ।।

(रघुवंश, १२, २४-२५)

या रामगडच्या उंच माथ्यावर तीन मोठाल्या राहण्यासारख्या गुहा राम, लक्ष्मण व सीता यांच्या आहेत. त्याच्या पठारावर एक झरा वाहत आहे. त्यांत राम, लक्ष्मण व सीता यांनी वनवासांत असतांना स्नान केलें, अशी आख्यायिका आहे. चित्रकूटावर अनेक ऋषींचे आश्रम होते, असें रामायणांत म्हटलें आहे. चित्रकूट म्हणजे रामगडच. म्हणून येथे ऋषिमुनींचे आश्रम होते, येथे एका भिंतीवर दोन पावलांच्या खुणा आहेत. तीं पावलें रामाचीं आहेत, असें म्हणतात. प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांत उल्लेखिलेल्या रामगिरिस्वामीच्या पादुका याच असाव्या. वाकाटकांचें राज्य भंडारा व बालाघाट या जिल्ह्यांवर पसरलें होतें. रामगड त्यांना लागूनच आहे. येथे प्रतिवर्षी जलवृष्टि होते. जवळपास असंस्कृत रानटी लोक आहेत. याच्या पश्चिमेला विस्तीर्ण पठार आहे. कालिदासाने खालील श्लोकांत मेघाला उदङ्मुख होऊन तेथे जावयास सांगितलें आहे —

स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खं
दिङ्नागानां पथि परिहरन् स्थूलहस्तावलेपान् ।।

(मेघ. १४)

या श्लोकांतील ' उदङ्मुखः ' याचा अर्थ कित्येक टीकाकार ' उत्तरेच्या दिशेने जा ' असा करतात. पण तो बरोबर बसत नाही. ' उदङ्मुख ' याचा अर्थ ' उत्तरेकडे तोंड वळवून

म्हणजे रोख ठेवून, म्हणजे अखेर उत्तरेस जावयाचें आहे, हें ध्यानीं धरून उड्डाण कर' एवढाच आहे. मालक्षेत्र रामगिरीच्या पश्चिमेकडेच असणें अधिक संभवनीय आहे. कारण पुढच्याच श्लोकांत

सद्यःसीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं
किञ्चित्पश्चाद् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ।।
(मेघ. १६)

यक्ष मेघास पश्चिमेस जाण्यास सांगत आहे. पश्चिमेस जावयाचें असतांना आधी उत्तर लगेच बदलून पुन्हा पश्चिम आणि नंतर पुन्हा उत्तर इतका द्राविडी प्राणायाम आणि आडवळणाचा मार्ग कशाला !

रामगड हा अमरकंटक व नर्मदा यांच्या पूर्वेला पण जरा वर १८ अंशांवर आहे. तेव्हा रामगडावरून निघणाऱ्या मेघाला अमरकंटकावरून नर्मदेच्या स्फुटित प्रवाहांवरून जावयाचें आहे; म्हणजे पश्चिमेलाच पण किंचित् मागे यावें लागतें. येथे 'किंचित् पश्चाद् व्रज' हा शब्दप्रयोग वापरून 'कांहीसें पश्चिमेला' व 'थोडेसें मागे' असे दोन्ही अर्थ दाखविणारा खुबीदार व बहारीचा श्लेष कालिदासाने बुद्धिपुरस्सर योजिला आहे. पुढे नर्मदा नदीचें वर्णन येणेप्रमाणे केलें आहे —

रेवां द्रक्ष्यस्युपलविषमे विन्ध्यपादे विशीर्णां
भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमङ्गे गजस्य ।।
(मेघ. १९)

अमरकंटकाजवळ उगमाच्या आसपास नर्मदा स्फुटितप्रवाहा आहे. तेथे आसपासच्या डोंगरांतून तिला शेकडो ओहोळ, प्रवाह-उपप्रवाह येऊन मिळतात. नकाशांतसुद्धा या प्रवाहांचें जाळें किती मजेदार व स्पष्ट दिसतें तें पहावें, म्हणजे वाचकांना कालिदासाच्या उपमेंतील सौंदर्य व समर्पकता यांची प्रचीती येईल. पुढे विसाव्या श्लोकांत —

तस्यास्तिक्तैर्वनगजमदैर्वासितं वान्तवृष्टि–
र्जम्बूकुञ्जप्रतिहतरयं तोयमादाय गच्छेः ।

'नर्मदेचें पाणी पिऊन किंवा शोषून जा' असा उल्लेख आहे. या ठिकाणीं 'नर्मदा ओलांड' या अर्थाचा 'उत्तीर्य' सारखा शब्द न घालतां 'गच्छेः' असा प्रयोग कवीने केला आहे. त्यामुळे नर्मदा नदी ओलांडावयाची नसून तिच्या काठाकाठाने जावयाचें आहे, असा हेतु ध्वनित होतो. त्याचा फलितार्थ असा की, मेघाचा मार्ग दाक्षिणोत्तर नसून पूर्वपश्चिम होता." या प्रमाणावरून सिरगुजा संस्थानांतील रामगड हाच रामगिरि हें सिद्ध होतें, असें परांजप्यांचें म्हणणें आहे.

**वरील प्रमाणांचें परीक्षण**

श्री. परांजप्यांचें म्हणणें शक्यतों त्यांच्या शब्दांत दिलें आहे. हेतु हा की, आपल्या म्हणण्याचा विपर्यास झाला अशी सबब त्यांना सापडूं नये. आता त्यांच्या प्रमाणांचें परीक्षण करूं.

सिरगुजा संस्थानांतील रामगड पर्वत अत्यंत उंच आहे व तें स्थान अत्यंत प्राचीन आहे, यांत संशय नाही. पण तेथील जोगीमाठा लेण्यांतील कोरीव लेखांत रामसीतांच्या पवित्र जीवनाचा निर्देश नसून एक देवदासी आणि तिचा प्रियकर यांच्या प्रणयप्रसंगाचा उल्लेख आहे. सीतावेंगरा नामक दुसऱ्या लेण्यांतील लेखांत कविजनांचा श्रोतृवर्गाच्या मनावरील परिणाम वर्णिला आहे — आदीपयन्ति हृदयं सभावगरुकवयो । (संस्कृत — आदीपयन्ति

हृदयं स्वभावगुरुकवयः ।). हें लेणें प्राचीन ग्रीक रंगमंदिराच्यासारखें आहे, असें एका विद्वानाचें म्हणणें आहे. तेव्हा हें स्थान ख्रिस्तपूर्वकाळांत यात्रेचें ठिकाण नसून कवींच्या मैफिलींचें व देवदासींच्या प्रणयप्रसंगांचें संकेतस्थान होतें, असें दिसतें. नंतरच्या काळांत तेथे कोणीं तरी पावलें कोरलीं आणि तीं भगवान् रामचंद्राचीं मानण्यांत येऊं लागलीं. तेथे बसविलेल्या राम, लक्ष्मण व सीता यांच्या मूर्ति त्यांच्या शिल्पांवरून मध्ययुगीन कालापेक्षा प्राचीन नाहीत. नंतरच्या काळांत तेथील झऱ्यांत राम, लक्ष्मण व सीता यांनी स्नान केलें, अशी दंतकथा प्रचलित झाली असे दिसतें. तथापि ती कालिदासकालाइतकी प्राचीन आहे, असें मानण्यास मुळीच आधार नाही. रामगड हाच चित्रकूट, या अजब सिद्धान्ताचें परीक्षण आम्ही पुढे करणार आहों. चित्रकूट प्रयागापासून फार दूर नव्हता, हें पुढे दाखविलें आहे. तेव्हा तो सुमारें २५० मैलांवरचा रामगड असणें शक्य नाही. प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांतील ' रामगिरिस्वामिनः पादमूलात् ' या स्थलनिर्देशांत रामगडचा उल्लेख असावा, असें अनुमान परांजप्यांनी केलें आहे, तेंहि सर्वस्वीं चूक आहे. ' वाकाटकांचे कांही ताम्रपट बालाघाट व भंडारा जिल्ह्यांत सापडले आहेत. तेव्हा या जिल्ह्यांचा अंतर्भाव प्राचीन विदर्भांत होत असे,' असें आम्हीं आपल्या लेखांत म्हटलें होतें. त्यावर परांजपे म्हणतात, ' बालाघाट व भंडारा जिल्ह्यांच्या पूर्वसीमेला लागूनच रामगड पर्वत उभा आहे ' (मे. न. प्र. पृ. ३८) हें विधान कसें हास्यास्पद आहे हें वऱ्हाड–मध्यप्रदेशांतलें एखादें शाळकरी पोरहि परांजप्यांस सांगूं शकेल. बालाघाट–भंडारा आणि सिरगुजा संस्थानांतील रामगड यांच्यामध्ये पूर्वीची कवर्धा, खैरागड आणि नांदगांव हीं संस्थानें आणि दुर्ग, रायपूर आणि बिलासपूर हे तीन जिल्हे आहेत. रामगड हें प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांतील रामगिरि असणें शक्य नाही, ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी स्पष्ट आहे. वाकाटकांचें राज्य रामगडपर्यंत पसरलें होतें, याला पुरावा नाही, आणि प्रभावतीगुप्ता तेथे गेली होती असें मानण्यास यत्किंचितहि आधार नाही. या उदाहरणावरून परांजपे आपल्या डळमळणाऱ्या रामगडला सावरण्याकरिता कसा ' येन केन प्रकारेण ' प्रयत्न करीत आहेत, तें दिसून येईल.

## रामगिरीची अविवाद्य कसोटी

रामगड पर्वत उंच आहे, तेथे नदी आहे, तींत रामसीतांनी स्नान केलें अशी आख्यायिका आहे, तेथे सध्या भिंतीवर दोन पावलें कोरलीं आहेत, तें स्थान निसर्गरम्य आहे. या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी रामगड म्हणजे रामगिरि हें सिद्ध करण्यास त्या पुरेशा नाहीत. भारतांत रामकथेशीं संबद्ध अशीं अनेक स्थलें आहेत आणि त्यांतील कांही उत्तुंग पर्वतांवर असून तेथे परांजपे रामगडविषयी सांगतात तशाच आख्यायिका प्रचलित आहेत. उदाहरणार्थ, कांही वर्षांपूर्वी नागपूरच्या एका गृहस्थांनी मोठ्या आग्रहाने असें प्रतिपादिलें होतें की, ' पूर्वीच्या बस्तर संस्थानांत बस्तरपासून १६ मैलांवर २६१७ फूट उंचीचा रामगिरि नामक पर्वत आहे. तें स्थान निसर्गरमणीय आहे. तेथे निचुल म्हणजे वेत उगवतात. तेथून उत्तरेकडे गेलें असतां हल्लीहि रानटी असलेले माड लोक राहतात. हा माड प्रदेश म्हणजे कालिदासाचा मालप्रदेश होय. म्हणून बस्तर संस्थानांतील रामगिरि हाच मेघदूतांतील रामगिरि होय. ' तेव्हा रामगिरित्वाचा मान मिळविण्याकरिता उत्सुक असे अनेक पर्वत उभे आहेत. त्यांतून मेघदूतांतील रामगिरीची निवड करावयाची असेल तर तिच्याकरिता एकच कसोटी अविवाद्य अशी ठरेल. ती म्हणजे कालिदासाने स्वतः मेघदूतांत वर्णिलेला मेघमार्ग त्या पर्वताला तंतोतंत जुळला पाहिजे. कालिदासाचें भौगोलिक वर्णन अत्यंत सूक्ष्म व यथातथ्य असतें अशी ख्याति आहे. ' कालिदासाची कविता किंवा कल्पकता वास्तवतेशीं काडीइतकीहि काडीमोड करीत नाही. त्याच्या

कल्पनेचा नाच सत्याभोवती असतो ' असें परांजपेहि म्हणतात. तेंव्हा ही भौगोलिक कसोटी त्यांस मान्य होईल अशी आहे. ही कसोटी मेघदूतांतील वर्णनाला लावतांना संस्कृत शब्दांचे अर्थ ओढाताणीनें करतां कामा नयेत. तसेंच, आपल्या कल्पना कालिदासावर लादण्याचा प्रयत्न करूं नये. केवळ वस्तुनिष्ठ दृष्टीने त्याच्या मेघमार्गाच्या वर्णनाचा विचार केला पाहिजे. तसा विचार केला असतां मेघमार्गाचें वर्णन विदर्भांतील रामटेकला पूर्णपणें जुळतें, हें आम्हीं इतरत्र दाखविलें आहे ( सं. मु. सर १, पृ. ५९-६० ) तें परांजप्यांच्या रामगडला कितपत जुळतें, तें आता पाहूं.

## मेघाचा मार्ग दक्षिणोत्तर

तेराव्या श्लोकांत ' मार्गं मत्तः शृणु कथयतस्त्वत्प्रयाणानुरूपम् ' (तुझ्या प्रयाणाला योग्य असा मार्ग मी तुला सांगतों तो ऐक ) अशी प्रस्तावना करून यक्षाने मेघास अलकेचा मार्ग सांगण्यास सुरवात केली आहे. रामगिरीविषयीं कोणतेंहि मत घेतलें तरी अलका त्या स्थलाच्या उत्तरेसच राहते. तेंव्हा यक्ष मेघाला उत्तरेस जाण्याचाच मार्ग सांगेल हें उघड आहे; आणि पुढील ( १४-व्या ) श्लोकांत तसेंच म्हटलें आहे —

स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खं ।
दिङ्नागानां पथि परिहरन् स्थूलहस्तावलेपान् ।।

या श्लोकांत यक्षाने मेघाला उदङ्मुख होऊन ( उत्तरेकडे तोंड करून ) उड्डाण करावयास सांगितलें आहे. मल्लिनाथादि टीकाकारांनी हाच अर्थ घेतला आहे. मल्लिनाथ म्हणतो — उदङ्मुखः सन् । अलकाया उदीच्यत्वादित्याशयः । ( उत्तरेकडे तोंड करून – कारण अलका उत्तरेकडे आहे म्हणून, असा यक्षाचा आशय आहे ). मेघदूताच्या सर्व आधुनिक संपादकांनी हाच अर्थ स्वीकारला आहे. पण ' उदङ्मुखः उत्पत ' याचा अर्थ ' उत्तरेकडे उड्डाण कर ' असा केल्यास तो ' रामगड हाच रामगिरि ' या परांजप्यांच्या मताला जुळणार नाही. कारण परांजप्यांच्या मताप्रमाणे सोळाव्या श्लोकांत वर्णिलेलें मालक्षेत्र रामगडच्या उत्तरेस नसून पश्चिमेस आहे. शिवाय रामगडहून उत्तरेस गेल्यास नर्मदा नदी, विदिशा इत्यादि लागणार नाहीत. म्हणून ते म्हणतात, ' उदङ्मुखः ' या शब्दयोगाने फसून जातां कामा नये. 'उदङ्मुख' म्हणजे उत्तरेकडे तोंड वळवून, म्हणजे रोख ठेवून, म्हणजे अखेर उत्तरेला जावयाचें आहे, हें ध्यानीं घरून उड्डाण कर, एवढाच अर्थ आहे. उदङ् म्हणजे उत्तर या शब्दाची व्याप्ति अखेरच्या मुक्कामाची दिशा स्पष्ट करण्यापुरतीच मर्यादित आहे ( मे. न. प्र., पृ. ८४ ) याला म्हणतात खरी मल्लिनाथी ! असा अर्थ केला म्हणजे ' मेघाने उत्तरेला तोंड करून पश्चिमेला जावें ' असा अर्थ या श्लोकांतून निघेल. आहे की नाही वकिली डावपेच ! हा अर्थ ओढाताणीचा होतो, ही कल्पना त्यांच्या मनाला खात असावी. म्हणून ते अन्यत्र म्हणतात, " प्राचीन काळीं आर्य लोक उत्तर दिशा शुभ समजत असत....म्हणून मेघाच्या प्रस्थानसमयीं – अगदी ऐन निघण्याच्या वेळीं प्रयाणमांगल्याकरितां यक्षाने ' उदङ्मुखः उत्पत ' असें मेघाला सांगितलें असलें पाहिजे" ( मे. न. प्र., पृ. ८७). ही कल्पनाहि निरर्थक आहे. येथे लोक फसत नसून परांजपे आत्मवंचना करीत आहेत. कालिदासाला हा अर्थ विवक्षित असता तर शकुनाकरिता उत्तरेकडे तोंड करून नंतर पश्चिमेकडे जा, असें त्यानें मेघाला सांगितलें असतें. तसें सांगण्याइतकें भाषाप्रभुत्व त्याच्या अंगीं खास होतें. पण तसा स्पष्ट वा अस्पष्ट निर्देश या श्लोकांत मुळीच नाही. मेघदूतांतील श्लोकांचे अर्थ स्वतःच्या मताविरुद्ध जाऊं नयेत, म्हणून परांजपे कसे फिरवितात, याचें हें एक उदाहरण आहे. अशीं आणखी कित्येक उदाहरणें पुढे येतील.

## मालप्रदेश रामगिरीच्या पश्चिमेस नव्हता

मेघ उत्तरेस निघाला म्हणजे त्याला प्रथम माल नामक प्रदेश लागेल, असें कालिदासाने श्लोक १६-मध्ये सांगितलें आहे. परांजप्यांचा मालदेश ( रत्नपूरच्या उत्तरेचा मालडा ) पश्चिमेस राहतो. शिवाय तो प्रदेश रामगडच्या मानाने सखल आहे. परांजप्यांना ही अडचण जाणवली, असें दिसतें. ते म्हणतात, ' पादपूरणार्थक अव्ययप्रमाणे मेघमार्गाच्या स्थळनकाशांत मध्ये बरीचशी जागा कोरी राहूं नये, एवढ्याकरिता कालिदासाने या मालपठाराचा उपयोग करून घेतला आहे....रामगिरि आणि आम्रकूट या दोन स्थळांच्या दरम्यान जी मोठी तूट, पोकळी किंवा खड्डा पडत होता तो भरून काढण्याकरिता घातलेली ही भर होय. मालक्षेत्र म्हणजे या दोहोंच्या मधील दुवा. ' हें कारण स्पेशल प्लीडिंगच्या ( प्रमाणाभासाच्या ) स्वरूपाचें आहे. चांगले कवि पादपूरणांचा उपयोग करीत नाहीत. कालिदासाच्या काव्यांतील प्रत्येक शब्द, किंबहुना शब्दावयवहि कसा साभिप्राय असतो, हें आनन्दवर्धनादि आलंकारिकांनी दाखविलें आहे. शिवाय कालिदासावर रामगिरि ते अलका या मार्गावरील सर्व प्रदेशांचें वर्णन करण्याची सक्ती कोणीं केली नव्हती. त्याने त्या मार्गावरील अनेक देश, पर्वत, नद्या गाळल्या आहेत. तो कांही त्या मार्गाचा भूगोल लिहीत नव्हता ! परांजपे म्हणतात त्याप्रमाणे मालप्रदेश इतका क्षुद्र असता तर त्याचा उल्लेख गाळून कवीला एकदम आम्रकूटाचें वर्णन करतां आलें असतें. शिवाय त्याने या मालप्रदेशाचें चुकीचें वर्णन कां घालावें ? परांजप्यांच्या मताप्रमाणे हें मालपठार रामगडच्या पश्चिमेस व त्या पर्वताच्या मानाने सखल आहे. मग कालिदास मेघाला तें उत्तरेस जातांना लागेल आणि रामगिरीहून जातांना तें मेघाला चढावें लागेल ( श्लोक १६ मधील ' आरुह्य ' शब्द पहा. ), असें कां सांगत आहे ? सारांश, मालप्रदेश रामगिरीच्या पश्चिमेस नव्हता आणि सखलहि नव्हता. श्लोक १४ व १६ यांमधील वर्णन निश्चितपणें रामगडच्या विरुद्ध जातें.

श्लोक १६-मध्ये यक्ष मेघास म्हणतो —

सद्यःसीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं
किञ्चित्पश्चाद् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ॥

या श्लोकावरून मालप्रदेश चढून गेल्यावर मेघाने थोडेसें पश्चिमेला वळून नंतर पुन्हा उत्तरेकडे जावयाचें आहे. या वर्णनांतील स्वारस्य व सूक्ष्मता आम्हीं इतरत्र दाखविली आहे ( सं. मु. सर १, पृ. ६० ). कालिदासाला रामगिरीहून विदिशेला मेघाला न्यावयाचें आहे. विदिशा रामगिरीच्या ( रामटेकच्या ) थेट उत्तरेस नसून त्या दिशेच्या किंचित् पश्चिमेस आहे. म्हणून मालदेश ओलांडल्यावर मेघाने किंचित् पश्चिमेकडे वळून नंतर उत्तरेकडे गेल्यावर त्याला आम्रकूट व नर्मदा लागेल आणि पुढे तसेंच उत्तरेस गेल्यावर तो विदिशा नगरीस पोचेल असें कालिदासाने वर्णिलें आहे. हें वर्णन रामटेकला तंतोतंत जुळतें; पण रामगडला मुळींच जुळत नाही. रामगडहून उत्तर दिशेस उड्डाण केल्यावर मेघाला माल प्रदेश लागणार नाही.. तो पश्चिमेस राहतो. ही अडचण उत्पन्न होते. तिजवर परांजप्यांचा तोडगा पहा. ते म्हणतात, ' १५-व्या ( ? ) श्लोकांत कांहीसा पश्चिमेला जा आणि मग पुन: उत्तरेला जा ' असा स्पष्ट दिशानिर्देश केलेला आहे. कांहीसा पश्चिमेला जर जावयाचें तर त्याच्याच आधी उत्तरेस जावयास कोण सांगेल ?... आधी उत्तर, लगेच बदलून पुन: पश्चिम आणि नंतर पुन्हा उत्तर – इतका द्राविडी प्राणायाम कशा-करिता ?...पश्चिमेकडे जावयाला निघण्यापूर्वी मालक्षेत्राला भेट देण्याकरिता उत्तरेला एक

उगीच वाकडी वेलांटी घेण्याला कांही सबळ कारण नाही. यावरूनहि माल रामगिरीच्या पश्चिमेलाच असावें, या म्हणण्याला पुष्टि मिळते (मे. न. प्र., पृ. ८४–८७). कालिदासाच्या श्लोकांचा अशा रीतीने आपणांस हवा तसा ओढाताणीने अर्थ लावणें रसिकांस मान्य होणार नाही. अर्थ करण्याची ही वस्तुनिष्ठ पद्धति नव्हे मालप्रदेश पश्चिमेला आहे, हें कालिदासास सांगावयाचें असतें तर तशी स्पष्ट शब्दयोजना त्याने केली असती.

**मालप्रदेशाचें वर्णन रामगडच्या विरुद्ध**

सद्य:सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं
किञ्चित्पश्चाद् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ॥

या श्लोकार्धाच्या अर्थाचा बारकाईने विचार केला असतां तो निश्चितपणें रामगडच्या विरुद्ध जातो. कसा तो पहा —

(१) माल पठारावर चढल्यावर (मालमारुह्य) मेघाने किंचित्पश्चिमेकडे वळावयाचें आहे. येथील ल्यबन्ताचा प्रयोग लक्षांत घेतला पाहिजे. 'समानकर्तृकयो: पूर्वकाले' या पाणिनिसूत्राप्रमाणे मालप्रदेशावर आरोहण करण्याची क्रिया पश्चिमेकडे वळण्यापूर्वीची आहे. अर्थातच मालप्रदेश रामगिरीच्या पश्चिमेस नव्हता. यापूर्वीच्या श्लोक १४-मधील 'उदङ्मुखः उत्पत' या शब्दांनी स्पष्ट दर्शविल्याप्रमाणे तो त्या गिरीच्या उत्तरेस होता.

(२) 'किञ्चित् पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' याचा अर्थ 'थोडेसें पश्चिमेला जाऊन नंतर **पुनः उत्तरेलाच** जा' (जाड टाइपांतले शब्द विशेष ध्यानांत घ्यावे) असा आहे व तसाच तो सर्व टीकाकारांनी दिला आहे. उदाहरणार्थ, मल्लिनाथ म्हणतो— 'किंचित्पश्चाद् व्रज गच्छ । लघुगतिस्तत्र निर्वृष्टत्वात् क्षिप्रगमन: सन् भूयः पुनरपि उत्तरेणैव उत्तरमार्गेणैव व्रज ।' भूयः (पुन्हा) या शब्दाच्या योगें पश्चिमेकडे वळण्यापूर्वी मेघ उत्तरेने जात होता हेंहि कालिदासाने सूचित केलें आहे. पूर्णसरस्वती यांची विद्युल्लता टीका इतर स्थलांप्रमाणे येथेहि कालिदासाचा आशय अत्यंत स्पष्ट करणारी आहे — 'उत्तरेण उत्तरदिग्भागेन । भूय: पुन:, **अङ्गीकृताया उत्तरदिशो मध्ये परित्यागात्** । एवकारो भिन्नक्रमः । उत्तरेणैव **प्रस्तुतेनेत्यर्थः** ।' याचा अर्थ असा – 'थोडासा मार्ग पश्चिमेकडे आक्रमण करून पुनः पूर्वीच्या, मध्यें खंड पडलेल्या, उत्तर दिशेनेच पुढे जा.' तेव्हा 'भूयः उत्तरेणैव' (पुन्हा उत्तर दिशेनेच) यांतील शब्दयोजनेवरून पश्चिमेकडे वळण्यापूर्वी मेघाने रामगिरीहून उत्तरेलाच जाऊन माल प्रदेशावर आरोहण करावयाचें होतें, हें स्पष्ट आहे. हा अर्थ परांजप्यांच्या मताविरुद्ध जातो. कारण त्यांना मेघाला रामगडावरून उज्जयिनीपर्यंत पश्चिमेच्याच मार्गाने न्यावयाचें आहे. (मे. न. प्र. पृ. ५७-वरचा त्यांचा नकाशा पहा.) या मार्गाला 'किंचित् पश्चाद् व्रज' हे शब्द विरुद्ध जातात. म्हणून ते त्यांचा अर्थ कसा विलक्षण करतात पहा—"येथे 'किंचित् पश्चिमेला' व 'थोडेसें मागे' असे दोनहि अर्थ दाखविणारा खुबीदार व बहारीचा श्लेष कालिदासाने बुद्धिपुरस्सर योजिला आहे तो लक्षांत आणला पाहिजे." (मे. न. प्र. पृ. ५८). 'पश्चात्' शब्दावरील हा श्लेष आतापर्यंत कोणाहि संस्कृत टीकाकाराच्या ध्यानांत आला नव्हता, तो मोठ्या परिश्रमाने शोधून काढल्याबद्दल परांजप्यांचें अभिनन्दन केलें पाहिजे. पण मेघाने उत्तरेस न जातां 'थोडेसें मागें' कां यावयाचें, हें आमच्या नीटसें ध्यानांत येत नाही. उंच उडी मारतांना मागे जावें लागतें. मेघासहि उंच उडावयाचें आहे. म्हणून का यक्ष त्यास मागे जावयास सांगत आहे ? 'किंचित् पश्चात् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' याचा सरळ अर्थ 'थोडासा पश्चिमेकडे चल, मग फिरून वेगाने

उत्तरेकडे जाशील' असा आहे आणि तो याच शब्दांत श्री. वा. कृ. परांजपे यांचे पितामह सुविख्यात रसिक कै. शि. म. परांजपे यांनी 'मेघदूतावरून कालिदासाविषयी' या आपल्या सरस निबंधांत दिला आहे (साहित्यसंग्रह, भाग १, पृ. ९५ पहा). हा अर्थ परांजप्यांच्या रामगडला मुळीच जुळत नाही. म्हणून ते म्हणतात. "पश्चात् व्रज – म्हणजे मेघाला बराचसा पश्चिमेला न्यावयाचा आहे, हें उघड आहे" (मे. न. प्र. पृ. ८९). ते 'किंचित्' याचा अर्थ 'बराचसा' करतात! संस्कृत भाषेचा नवा कोश रचला पाहिजे! बरें, रामगिरीपासून विदिशेपर्यंत पश्चिम दिशेचाच मार्ग मेघाने आक्रमण करावयाचा होता तर पुढे उज्जयिनीला त्याला त्याच दिशेने पुढे जातां आलें असतें. उज्जयिनीला जातांना त्याची वाट वाकडी झाली नसती. कालिदास तर विदिशेहून उज्जयिनीला जातांना मेघाला वाकडे जावें लागेल, असें खालील श्लोकार्धांत म्हणत आहे —

वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां
सौधोत्सङ्गप्रणयविमुखो मा स्म भूरुज्जयिन्याः ।।
(मेघ. २७)

यावरूनहि रामगिरि ते विदिशा हा मेघमार्ग दक्षिणोत्तर होता, पूर्वपश्चिम नव्हता, हें स्पष्ट दिसून येईल.

### आम्रकूट हा अमरकंटक नव्हे

रामगिरीहून निघून मालप्रदेश ओलांडल्यावर किंचित् पश्चिमेने व नंतर पुन्हा उत्तरेने गेल्यावर मेघाला आम्रकूट पर्वत लागणार होता. परांजपे आम्रकूट म्हणजे अमरकंटक समजतात. पण त्याला हा मार्ग जुळत नाही. अमरकंटक रामगडच्या दक्षिणपश्चिम दिशेस आहे. पश्चिमोत्तर दिशेस नाही. शिवाय त्यानंतरचें मेघमार्गाचें वर्णन अमरकंटकास मुळीच जुळत नाही —

तस्मिन् स्थित्वा वनचरवधूभुक्तकुञ्जे मुहूर्तं
तोयोत्सर्गद्रुततरगतिस्तत्परं वर्त्म तीर्णः ।
रेवां द्रक्ष्यस्युपलविषमे विन्ध्यपादे विशीर्णां
भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमङ्गे गजस्य ।।
(मेघ. १९)

या श्लोकांत म्हटलें आहे की, आम्रकूटावरच्या कुंजांत कांही काळ थांबून जलवृष्टि केल्यावर हलक्या झालेल्या मेघाने त्यानंतरचा मार्ग जास्त वेगाने आक्रमण करून (द्रुततर-गतिस्तत्परं वर्त्म तीर्णः) नर्मदा नदीस पोहोंचावें. मेघाला नर्मदा नदीचें दर्शन आम्रकूटाजवळ व्हावयाचें नसून त्यानंतर कांही प्रदेश द्रुततरगतीने आक्रमिल्यावर होणार होतें. अर्थातच आम्रकूट व नर्मदा यांच्यामध्ये बराच प्रदेश होता आणि आम्रकूटावर जलवृष्टि करण्यापूर्वी जलभाराने जड झालेल्या मेघाला तो आक्रमण करण्यास बराच काळ लागला असता असें सूचित होत आहे. आम्रकूटाचें हें वर्णन अमरकंटकास मुळीच जुळत नाही. अमरकंटकाचें प्राचीन नांव आम्रकूट नसून मेकल होतें. नर्मदानदीचा उगम अमरकंटकजवळ होतो म्हणून तिला मेकलकन्यका म्हणतात. अमरकंटकाचें दुसरें नांव आम्रकूट असल्यास त्याचा पुरावा पाहिजे. शिवाय अमरकंटकानंतर उत्तरेस कांही मार्ग आक्रमिल्यावर नर्मदा नदी लागत नसून अमरकंटकांतच तिचा उगम होतो. तिसरी गोष्ट ही की, वरील श्लोकांतील नर्मदा नदीचें वर्णन अमरकंटकाजवळच्या नर्मदेस मुळीच जुळत नाही. विंध्य पर्वताच्या पायथ्याशीं

खडकाळ भागांत ( उपलविषमे विन्ध्यपादे ) वर्षाकालारंभीं नर्मदा नदीचा आटलेला प्रवाह अनेक स्रोतांत विभक्त होऊन वाहत असतो, त्याचें हें वर्णन आहे. परांजप्यांनी कै. प्रा. का. बा. पाठक यांच्या भाषांतरांतील उद्धृत केलेल्या पुढील उताऱ्यांत तोच अर्थ विवक्षित आहे —

'And traversing the road beyond Āmrakūta at a swifter pace by reason of the discharge of water, thou wilt see the Narmadā parted into streamlets at the foot of the Vindhya rugged with stones and resembling the figures composed of the marks of painted streaks on the body of an elephant.'

या भाषांतरांतील अर्थ अमरकंटकाच्या विरुद्ध जातो, हें इंग्रजीचें सामान्य ज्ञान असलेला कोणीहि सांगेल. Narmadā parted into streamlets म्हणजे नर्मदेला येऊन मिळणारे अनेक प्रवाह नव्हत, तर पूर्वी ( वर्षादिऋतूंत ) एकप्रवाहांत वाहणाऱ्या नर्मदेचें ग्रीष्म-ऋतूंत पाणी आटल्यामुळे विन्ध्यपर्वताच्या पायथ्याशीं खडकाळ भागांत झालेले अनेक स्रोत होत. 'नकाशांत नर्मदाप्रवाहाचें जाळें स्पष्ट दिसतें' असें परांजपे म्हणतात. कालिदास नकाशांतलें नर्मदेस मिळणाऱ्या प्रवाहांच्या जाळ्यांचं वर्णन करीत नाही, तर प्रत्यक्ष वस्तु-स्थितींत नर्मदेचा प्रवाह खडकाळ प्रदेशामुळे अनेक भागांत विभक्त झालेला वर्णीत आहे. नकाशांत जवळजवळ दिसणाऱ्या प्रवाहांमध्ये कित्येक मैलांचें अंतर असतें. तसे प्रवाह येथे विवक्षित नाहीत.

## मेघाचा नर्मदा–नदीवरचा मार्ग

रामगिरीहून उत्तरेकडे तोंड करून उड्डाण केलेल्या मेघाला प्रथम माल प्रदेश, नंतर किंचित् पश्चिमेकडे वळून पुन्हा उत्तरेला गेल्यावर आम्रकूट पर्वत, पुढे त्यानंतरचा मार्ग द्रुततर गतीने आक्रमिल्यावर नर्मदानदी लागणार होती. या मार्गावरील आम्रकूट म्हणजे अमर-वाड्याच्या उत्तरेचा पर्वत हे आम्हीं इतरत्र दाखविलें आहे. नर्मदानदीचें हें दृश्य नरसिंगपूर-होशंगाबाद या भागांत हल्लीहि उन्हाळ्यांत दृष्टीस पडतें. रामगिरीपासून नर्मदानदीपर्यंतचा मार्ग दक्षिणोत्तर आहे, हें मागे दाखविलें आहे. यानंतर मेघाला दशार्ण देशाची राजधानी विदिशा येथे न्यावयाचें आहे. विदिशा नर्मदेच्या उत्तरेस आहे. तेव्हा नर्मदानदीचें पाणी पिऊन जा ( तोयमादाय गच्छेः । ) असें यक्ष मेघास सांगत आहे. रामटेकपासून विदिशेचा मार्ग अगदी याच तऱ्हेचा असल्यामुळे त्यांत कांहीच अडचण नाही. पण परांजप्यांच्या मताप्रमाणे रामगड हा रामगिरि मानिल्यास मेघाला नर्मदानदी ओलांडावी लागणार नाही, ही मोठीच अडचण उपस्थित होते. ती त्यांनी कशी दूर केली, हें पाहिल्यावर त्यांच्या कल्पकतेचें कौतुक करावेसें वाटतें. ते म्हणतात, " नर्मदेचें पाणी पिऊन किंवा शोषून पुढे जा, असा 'गच्छेः' ( श्लो. २० ) हा उल्लेख आहे. या ठिकाणीं 'नर्मदा ओलांड' अथवा 'उत्तीर्य' इत्यादि अर्थाचा शब्द न घालतां नुसता 'गच्छेः' असा प्रयोग कवीने केला आहे. त्यामुळे नर्मदानदी ओलांडावयाची नसून तिच्यावरून काठाकाठाने जावयाचें आहे, असा हेतु ध्वनित होतो. त्याचा फलितार्थ हा की, मेघाचा मार्ग दक्षिणोत्तर नसून पूर्वपश्चिम होता " ( मे. न. प्र. पृ. ९९ ). आहे की नाही शब्दांच्या अर्थाचा कीस काढण्याची अजब पद्धत ? महाकवि एकच शब्द किंवा एकच कल्पना अनेकदा योजीत नाहीत. विशेषतः कालिदास विवक्षित अर्थ अनेक प्रकारांनी व्यक्त करण्यांत निपुण आहे. जेथे एखाद्या नदीला उत्तीर्य ( ओलांडून ) असा स्पष्ट निर्देश केला नसेल तेथे तिच्या काठाकाठाने जाणें कवीला अभिप्रेत आहे, असें मानिलें तर अनवस्थाप्रसंग येईल. कसा तें पहा —

खिन्नः खिन्नः शिखरिषु पदं न्यस्य गन्तासि यत्र
क्षीणः क्षीणः परिलघु पयः स्रोतसां चोपयुज्य ॥
(मेघ. ३)

या श्लोकार्धांतहि 'गम्' धातूचाच प्रयोग केला आहे. पण त्यामुळे रामगिरि ते अलका या मार्गावरचे पर्वत व नद्या मेघाने ओलांडावयाचे नाहीत (कारण 'उत्तीर्य' सारखें पद योजिलें नाही), तर त्यांच्या बाजूबाजूने जावयाचें आहे असें मानल्यास काय आपत्ति येईल, याचा विचार वाचकांनी करावा. कालिदासाने केवळ नर्मदानदीच्या बाबतींत 'उत्तीर्य'-सारख्या शब्दाचा प्रयोग टाळला आहे, असें नसून वननदी (श्लो. २६), सिन्धु (श्लो. २९), सिप्रा (श्लो. ३१), गम्भीरा (श्लो. ४१ व ४३), सरस्वती (श्लो. ५१) आणि गंगा (श्लो. ५२) या नद्यांना मेघानें ओलांडावें, असें स्पष्ट म्हटलें नाही. मग या सर्व नद्यांच्या काठाकाठाने जावें, असें समजावयाचें काय ? अर्थात् नाही. नर्मदानदीच्या बाबतींतील वर्णन असेंच आहे. तेव्हा इतर नद्यांप्रमाणे तीहि नदी मेघाने ओलांडावयाची होती, असेंच मानिलें पाहिजे. अर्थात् मेघाचा मार्ग पूर्वपश्चिम नसून दक्षिणोत्तरच होता. रामगडहून उत्तरेस जातांना नर्मदानदी ओलांडावी लागत नाही, म्हणून रामगड रामगिरि होऊं शकत नाही.

येथवर मेघदूतांतील भौगोलिक स्थितीचें वर्णन रामगडच्या कसें विरुद्ध जातें, हें दाखविलें. आता आपल्या मताला टेकू देण्याकरिता परांजप्यांनी रामायणांत उल्लेखिलेल्या ऋक्षबिलाचा जो आधार घेतला आहे, त्याचा विचार करूं.

## ऋक्षबिल आणि हाथीफोड गुहा

रामगड पर्वतांत एक विस्तीर्ण व लांबच-लांब आरपार गुहा किंवा बोगदा आहे तिला हाथीफोड म्हणतात. याच गुहेंत हनुमान् वगैरे वानरवीर सीताशोधार्थ आले होते, असें परांजपे सांगतात आणि आपल्या विधानाच्या समर्थनार्थ रामायणांतील खालील श्लोक उद्धृत करतात —

दुर्गं ऋक्षबिलं नाम दानवेनाभिरक्षितम्
अवकीर्णं लतावृक्षैर्ददृशुस्ते महाबिलम् ॥
(किष्किंधाकांड, ५०-८)

या स्थळीं किंवा याच्या आसपास राम व सीता राहत असावे, असें त्यांचें अनुमान आहे. वनवासांत असतांना राम सीतेसह एकाच पर्वतावर राहत होते. तो म्हणजे चित्रकूट. तेव्हा रामगडचें पूर्वीचें नांव चित्रकूट होय, असें ते सांगतात. रामगडांतील हाथीफोड गुहेला ऋक्षबिल म्हटलें आहे. तेव्हा चित्रकूटाला ऋक्ष असेंहि नांव होतें, असें ते म्हणतात आणि त्याच्या समर्थनार्थ रघुवंशांतील खालील श्लोक उद्धृत करतात —

रामस्त्वासन्नदेशत्वाद् भरतागमनं पुनः
आशङ्क्योत्सुकसारङ्गां चित्रकूटस्थलीं जहौ ॥
प्रययावातिथेयेषु वसन् ऋषिकुलेषु सः
दक्षिणां दिशमृक्षेषु वार्षिकेष्विव भास्करः ॥
(रघु. १२, २४-२५.)

या श्लोकांवरून चित्रकूट ऋक्षपर्वताच्या परिसरांत होता, असें अनुमान आहे. तेव्हा त्यांच्या मतें रामगड = चित्रकूट = ऋक्ष असें आहे. तेव्हा आता त्यांच्या प्रमाणांचें थोडक्यांत परीक्षण करूं.

### ऋक्षबिलाचें खरें स्थान

ऋक्षबिलाचें विस्तृत वर्णन रामायणाच्या किष्किंधाकांडाच्या ५० ते ५२ सर्गांत आलें आहे. पन्नासाव्या सर्गाच्या आरंभीं इतर वानरांना घेऊन हनुमान् विन्ध्यपर्वतावरील अरण्यें व गुहा शोधण्यास गेला असें खालील श्लोकांत म्हटलें आहे —

सह ताराङ्गदाभ्यां तु संगम्य हनुमान् कपिः
विचिनोति च विन्ध्यस्य गुहाश्च गहनानि च ॥

नंतर शोध करीत करीत ते विन्ध्य पर्वताच्या दक्षिणपश्चिम टोकाजवळ आले.

आसेदुस्तस्य शैलस्य कोटिं दक्षिणपश्चिमाम्
तेषां तत्रैव वसतां स कालो व्यत्यवर्तत ॥

नंतर दक्षिण दिशेचे गिरिजालावृत प्रदेश शोधीत असतां त्यांना ऋक्षबिल दिसलें, असें पुढे म्हटलें आहे—

गिरिजालावृतान् देशान् मार्गित्वा दक्षिणां दिशम्
विचिन्वन्तस्तत्र तत्र ददृशुर्विवृतं बिलम्
दुर्गं ऋक्षबिलं नाम दानवेनाभिरक्षितम् ॥

ऋक्षबिलाच्या या वर्णनावरून तें विन्ध्यपर्वताच्या दक्षिणपश्चिम भागाच्या दक्षिणेस असलेल्या प्रदेशांत होतें, हें स्पष्ट आहे. अर्थातच तें विन्ध्यपर्वताच्या पूर्व टोकांतील रामगड होऊं शकत नाही. ऋक्षबिल या नांवावरूनहि हें ऋक्षपर्वतांतील बिल किंवा विवर होतें, हें स्पष्ट आहे. ऋक्ष हें सातपुड्याचें प्राचीन नांव होतें. तापी, पयोष्णी ( पूर्णा ), निर्विन्ध्या या नद्या सातपुड्यांत उगम पावतात. त्यांना मार्कंडेयपुराणांत ऋक्षपर्वतांतून निघणाऱ्या नद्या ( तापीपयोष्णीनिर्विन्ध्याप्रमुखा ऋक्षसम्भवाः । ) असें म्हटलें आहे. त्यावरूनहि ऋक्ष म्हणजे सातपुडा हें सिद्ध होतें.

कालिदासहि सातपुड्यालाच ऋक्ष म्हणतो. रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत अज अयोध्येहून विदर्भाची राजधानी कुंडिनपुर येथे इंदुमतीच्या विवाहाकरिता जातो, असें वर्णिलें आहे. वाटेंत विन्ध्यपर्वताच्या पायथ्याशीं नर्मदानदीच्या तीरीं त्याच्या सैन्याचा तळ पडला. तेव्हा ऋक्षपर्वताच्या तटाशीं वप्रक्रीडा करण्यामुळे ज्याच्या दंतावर निळ्या उभ्या रेघा उमटल्या आहेत, असा हत्ती विरुद्ध दिशेने नर्मदानदी ओलांडून आला असें वर्णन कालिदासाने केलें आहे ( रघु. ५, ४४ ). त्यावरून ऋक्षपर्वत नर्मदेच्या दक्षिणेस होता. अर्थात् तो सध्याचा सातपुडा-पर्वत होय, हें स्पष्ट आहे. तेव्हा तो विन्ध्याच्या पूर्व टोकाशीं असणारा रामगड होऊं शकत नाही. रामगड हा चित्रकूट नव्हे, हें आम्ही पुढे दाखविणार आहों. पण तो चित्रकूट आहे असें मानिलें तरी कालिदासाच्या खालील श्लोकावरून तो ऋक्षपर्वताच्या परिसरांत होता असें सिद्ध होत नाही —

रामस्त्वासन्नदेशत्वाद् भरतागमनं पुनः
आशङ्क्योत्सुकसारङ्गां चित्रकूटस्थलीं जहौ ॥
प्रययावातिथेयेषु वसन् ऋषिकुलेषु सः
दक्षिणां दिशमृक्षेषु वार्षिकेष्विव भास्करः ॥

या श्लोकांचा खरा अर्थ असा की, चित्रकूटपर्वत भरताचें निवासस्थान नन्दिग्राम यापासून जवळच असल्याने भरत पुन्हा येऊन आपणांस राज्य स्वीकारण्याविषयी आग्रह करील, या भीतीने रामाने चित्रकूट पर्वत सोडला आणि ज्याप्रमाणे वर्षाऋतूंतील नक्षत्रांमधून

जात जात सूर्य दक्षिण दिशेस पोचतो, त्याप्रमाणे आतिथ्यशील ऋषींच्या आश्रमांत कांही काळ राहत-राहत राम दक्षिण दिशेस गेला. ऋक्षपर्वताचा येथे मुळीच उल्लेख नाही. ऋक्ष म्हणजे नक्षत्र या शब्दाचा ऋक्षपर्वताशीं बादरायण-संबंधसुद्धा नाही. परांजप्यांना या श्लोकांत ऋक्ष शब्द दिसला आणि चित्रकूट पर्वतांत ( रामगडांत ) ऋक्षबिल होतें हें सिद्ध करण्यासाठी बुडत्याला काडीचा आधार या म्हणीप्रमाणे त्यांनी तो पकडला. पण त्या काडींत त्यांना तारण्याचें सामर्थ्य नाही. 'ऋक्षेषु' शब्दावर श्लेष आहे असें एकाहि टीकाकाराने म्हटलें नाही. वादाकरिता 'ऋक्षेषु' यावर श्लेष आहे असें मानिलें तरी त्याचा अर्थ ऋक्षपर्वत होऊं शकत नाही. पर्वतांचीं नांवें इंग्रजींत बहुवचनान्त असतात तशीं तीं संस्कृतांत असत नाहीत, ही साधी गोष्ट नवशिक्या विद्यार्थ्यांसहि माहीत असते. तथापि परांजप्यांस जरूर असल्यास एकदोन उदाहरणें कालिदासाच्याच रघुवंशांतील देतों —

पतिर्महेन्द्रस्य महोदधेश्च । रघु. ६, ५४.
विन्ध्यस्य संस्तम्भयिता महाद्रेः । रघु. ६, ६१.

या श्लोकांत महेन्द्र व विन्ध्य या पर्वतांचा उल्लेख एकवचनांतच केला आहे. तेव्हा उपरिनिर्दिष्ट 'ऋक्षेषु' शब्दांत ऋक्षपर्वताचा उल्लेख नाही. त्या शब्दाने परांजप्यांस तोंडघशी पाडलें आहे.

वादाकरिता क्षणभर 'ऋक्षेषु' याने ऋक्ष पर्वत विवक्षित आहे, असें मानिलें तरी रघुवंशांतील वर उद्धृत केलेल्या श्लोकांतून चित्रकूट ( परांजप्यांचा रामगड ) ऋक्ष पर्वताच्या परिसरांत होता, असा अर्थ निघत नाही. चित्रकूट सोडून राम दूरवरच्या ऋक्षपर्वतांत गेला असें फार तर म्हणतां येईल. त्यावरून चित्रकूट ऋक्षपर्वतापासून दूर होता, असेंच निष्पन्न होईल. त्या श्लोकांवरून हाथीफोड गुहा ऋक्षबिल कशी होणार? 'भक्षितेऽपि लशुने न शान्तो व्याधिः'. एवढा आटापिटा करून 'ऋक्ष' शब्दावरचा श्लेष शोधून काढला, पण त्यामुळे कार्यसिद्धि होत नाही हें पाहून परांजप्यांची निराशा होईल, पण त्याला नाइलाज आहे.

## ऋक्षबिलाचें रामायणांतील वर्णन

चित्रकूट ( रामगड ) ऋक्षपर्वतांत होता असें मानिलें तरी रामायणांतील ऋक्षबिलाचें वर्णन रामगड-पर्वतांतील हाथीफोड बोगद्यास लागू पडणार नाही. किष्किंधाकांडाच्या पन्नासाव्या सर्गांत ऋक्षबिलाचें पुढील वर्णन आलें आहे —

"हें बिल एक योजनापेक्षा ( ८ मैलांपेक्षा ) जास्त लांब होतें. त्यांत चंद्रसूर्याचें दर्शन होत नसे. त्यांत सोन्याचे वृक्ष, साल, ताल, तमाल, चम्पक, लता, कमलिनी होत्या. सोन्याचे, चांदीचे, वैदूर्य रत्नाचे प्रासाद होते ( हैमराजतभौमानि वैदूर्यमणिमन्ति च । ददृशुस्तत्र हरयो गृहमुख्यानि सर्वशः ॥ ५०, ३१–३२). सोनें, चांदी, कांस्य इत्यादि धातूंचीं पात्रें, चंदनाचे संचय, फलमूलांच्या, तसेंच कंबल, अजिन इत्यादिकांच्या राशि होत्या. त्या गुहेमध्ये वानरांना एक चीरकृष्णाजिन परिधान केलेली तापसी भेटली. तिने वानरांना सांगितलें की, 'हें सर्व ऐश्वर्य मयासुराचें आहे. त्याला इन्द्राने ठार मारलें. मयासुर हेमा नामक नृत्यगीत-विशारद अप्सरेवर अनुरक्त होता. तिची मी स्वयंप्रभा नामक कन्या. मी तिच्याकरिता या गुहेचें रक्षण करतें. या गुहेंत एकदा प्रवेश केल्यावर बाहेर पडणें दुष्कर आहे.' शेवटीं वानरांच्या प्रार्थनेवरून तिने त्यांना डोळे मिटावयास सांगून एका निमिषांत त्यांना विंध्यपर्वताजवळ आणून सोडलें."

### ऋक्षबिल हाथीफोड नव्हे

रामायणांतील ऋक्षबिलाचें वर्णन संक्षेपरूपाने वर दिलें आहे. त्यावरून तें सर्वस्वीं काल्पनिक आहे, असें दिसून येईल, रामगड पर्वताच्या हाथीफोड गुहेस मुळीच लागू पडणार नाही. बेग्लरसाहेबांच्या वर्णनावरून हाथीफोड बोगदा सुमारें ४५० फूट लांब आहे, तर रामायणांतील वर्णनाप्रमाणे ऋक्षबिल एक योजन ( आठ मैल ) लांब होतें. रामटेकची उंची व बांदा जिल्ह्यांतील चित्रकूटपर्वताचें अंतर अनुक्रमें मेघदूत व रामायण यांतील वर्णनाशीं पूर्णपणें जुळत नाही, म्हणून खळखळ करणारे परांजपे ऋक्षबिल व हाथीफोड यांच्यामध्ये जमीनअस्मानचा फरक असतांहि ते एक आहेत, असें म्हणतात. त्यावरून त्यांची सत्यप्रियता व्यक्त होते. ऋक्षबिलाच्या या वर्णनावरून श्री. परांजपे काव्यमय वर्णनें वस्तुस्थितिनिदर्शक नसतात, एवढा धडा जरी शिकतील तरी फार उत्तम होईल.

### परांजप्यांचा दुसरा सिद्धान्त — रामगड हाच चित्रकूट

येथवर पूर्वीच्या सिरगुजा संस्थानांतील रामगड हा ऋक्ष पर्वताच्या परिसरांत नव्हता, तसेंच मेघदूतांतील मेघमार्गाच्या वर्णनावरून तो त्या काव्यांत वर्णिलेला रामगिरिहि होऊं शकत नाही, हें सविस्तर दाखविलें. आता त्यांच्या आणखी एका सिद्धान्ताचें परीक्षण करावयाचें आहे. रामगड हाच रामायणांत वर्णिलेला चित्रकूट, हा तो सिद्धान्त होय. वास्तविक ही कल्पना मूळची बेग्लरसाहेबाची. रामगडपर्वतावरील गुहा, मूर्ति व पादुका पाहिल्यावर आणि रामकथेशीं संबद्ध अशी आख्यायिका ऐकिल्यावर त्याला रामगड हा चित्रकूट असावा, अशी कल्पना सुचली आणि ती त्याने विविध प्रमाणांनीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला ( कनिंगहॅमचा आर्किऑलॉजिक सर्व्हे रिपोर्ट, व्हॉ. १३, पृ. ४२-५० पहा. ) बेग्लरचीं कित्येक प्रमाणें परांजप्यांनी जशींच्या तशींच घेतलीं आहेत, पण त्या साहेबाची उसनवारी कबूल केली नाही. संशोधनक्षेत्रांत पूर्वगामी संशोधकाचें ऋण न मानणें अनुचित मानिलें जातें. असो.

### परांजप्यांचीं प्रमाणें

रामगड म्हणजे चित्रकूट हें सिद्ध करण्यास परांजपे पुढील प्रमाणें देतात —

“ सध्या बुंदेलखंडांतील कामताजवळचा चित्रकूट हा रामायणांत राम, सीता व लक्ष्मण यांचें कांही काल निवासस्थान म्हणून वर्णिलेला चित्रकूट नव्हे. कारण रामायणांतील वर्णन त्याला जुळत नाही. तो उंच, गगनचुंबी नाही, तर त्याची उंची ५०० फुटांच्या आंत आहे. त्याला शिखर नाही. त्यावर गुहा व जलप्रवाह नाहीत. त्यामुळे रघुवंशांतील ( १३–४७ )

> धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ शृङ्गाग्रलग्नाम्बुदवप्रपङ्कः ।
> बध्नाति मे बन्धुरगात्रि चक्षुर्दृप्तः ककुद्मानिव चित्रकूटः ॥

हें वर्णन त्याला जुळत नाही. तेथे मोठाले वृक्ष किंवा जंगल नाही. हत्ती माहीत, कारण त्यांना राहण्यासारखें दाट किंबहुना विरळसुद्धा जंगल नाही. पण हें सर्व वर्णन सिरगुजा संस्थानांतल्या रामगडला पूर्णपणें जुळतें. तो ३२०० फूट उंच आहे त्याच्या गुहेतून वाहणारा जलप्रवाह व धबधबा आहे. प्रचंड वृक्षांचें जंगल आहे. सीताबेंगरा नामक गुहा उत्तर चढाबरच आहे. जंगली हत्तीहि आहेत. रामायणांत म्हटलें आहे की, चित्रकूट प्रयागपासून दहा कोसांच्या अंतरावर आहे. बुंदेलखंडांतील चित्रकूट प्रयागपासून ६५ मैलांवर आहे. तेव्हा अंतर जमत नाही. मग तें १५० मैलांपर्यंत ताणून रामगडपर्यंत आणण्यास काय हरकत आहे ! ( मे. न. प्र., पृ. ११४ ).

दशक्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन्निवत्स्यसि
चित्रकूट इति ख्यातो गन्धमादनसंनिभः ॥

या रामायणांतील भरद्वाजाच्या भाषणांत मूळचा पाठ शतक्रोश असावा. सिरगुजा संस्थानांतील चित्रकूटास रामगिरि नांव पडलें व कालावधीने त्या रामगिरीचा रामगड झाला. म्हणून बुंदेलखंडांतील चित्रकूट हा तोतया चित्रकूट असून खरा चित्रकूट हा सिरगुजा संस्थानांतील रामगड होय. ''

### वरील प्रमाणांचें परीक्षण

आता परांजप्यांच्या या सिद्धान्ताचें परीक्षण करूं.

रामटेक हें रामगिरि नव्हे, हें सिद्ध करण्याकरिता ज्या बालिश प्रमाणांचा परांजप्यांनी अवलंब केला आहे तशींच प्रमाणें बांदा जिल्ह्यांतील चित्रकूट हा खरा चित्रकूट नव्हे, हें ठरविण्याकरिता त्यांनी पुढे मांडलीं आहेत. प्राचीन काळांतल्यासारखे लतावृक्ष, हत्ती, हरिण, मोर इत्यादि पशुपक्षी हजारों वर्षांनंतर आजहि दिसले पाहिजेत, ही त्यांची अपेक्षा अयोग्य आहे. वाल्मीकीच्या काळाला आज हजारों वर्षें झालीं. कालिदास सुमारें इ. स. ४००-च्या सुमारास होऊन, गेला असें मानिलें जातें. त्याच्याहि कालाला आज दीड हजारांहून अधिक वर्षें झालीं (कांहीं विद्वानांच्या मतें तो खिस्तपूर्व पहिल्या शतकांत होऊन गेला. त्यांच्या मताप्रमाणे तर हा काल दोन हजार वर्षें होईल). या प्रदीर्घ काळांत भौगोलिक परिस्थितीखेरीज इतर परिस्थिति तशीच टिकून राहिली असेल, हें संभवनीय नाही. भगवान् रामचंद्र चौदा वर्षांनंतर दंडकारण्यास भेट देतात त्या वेळीं त्यांना त्या अल्प कालावधींत त्या अरण्यांत किती फरक पडलेला दिसला, हें भवभूतीने उत्तररामचरिताच्या खालील श्लोकांत वर्णिलें आहे —

पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरितां
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥
(उत्तरराम० २–२७)

(भावार्थ—जेथे पूर्वी नद्यांचा प्रवाह होता तेथें आता वाळवंट झालें आहे. झाडी दाट होती तेथे विरल आणि विरल होती तेथे दाट झाली आहे. पुष्कळ वर्षांनी हें वन पाहिल्यामुळे तें निराळेंच दिसत आहे. सभोवारचे पर्वत पाहून मात्र हेंच पूर्वींचें दंडकारण्य अशी मनाची खात्री होत आहे.)

केवळ चौदा वर्षांच्या अल्प कालावधीनंतर दंडकारण्यांत – जेथे लोकवस्ती विशेष नव्हती तेथे – परिस्थितींत, इतका फरक पडला, तर दीड-दोन हजार वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर रामटेक व चित्रकूट यांच्या व त्यांच्या परिसरांच्या परिस्थितींत पुष्कळच फरक पडला असल्यास आश्चर्य नाही. उंची वगैरेंच्या बाबतींत कवींचें वर्णन वास्तविक मानण्यांत काय आपत्ति येते, हें मागील ऋक्षबिलाच्या उदाहरणावरून परांजप्यांना पटलें असेल. त्यांना पटलें नसलें तरी सुज्ञ वाचकांस तें पटेल, अशी आशा आहे. तेव्हा सामान्यतः रामायणांतील वर्णन एखाद्या स्थळास जुळत असेल तर उगीच खळखळ करूं नये. तसें तें बांदा जिल्ह्यांतील चित्रकूटास जुळतें, हें कनिंगहॅमने सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वी आपल्या आर्किऑलॉजिकल सर्व्हेच्या एकविसाव्या व्हॉल्यूममध्ये (पृ. १०–१३) बेग्लर साहेबाचें मतखंडन करून दाखविलें आहे.

**चित्रकूटाचा मार्ग**

रामायणांत म्हटलें आहे कीं, राम, सीता व लक्ष्मण भरद्वाजाश्रमांत कांही काळ राहिले. नंतर रामचंद्रांनी भरद्वाजऋषीला प्रार्थना केली कीं, 'भगवन्, आम्हांस या आश्रमांत राहणें प्रशस्त वाटत नाही. तेव्हा एखादें एकान्त असें आश्रमस्थान सांगा.' तेव्हा भरद्वाजऋषि म्हणाले, 'रामा, येथून दहा कोसांवर महर्षींनी सेविलेला असा चित्रकूटनामक पर्वत आहे. तेथे तूं आपला वनवासाचा काळ घालवावा.' त्यानंतर गंगायमुनांच्या संगमापासून निघून यमुनानदीच्या काठाने रामचंद्र सीता व लक्ष्मण यांसह कांही अंतर गेले आणि यमुनानदी पार करून श्याम नामक वटवृक्षास पोचले. पुढे एक कोस गेल्यावर त्यांना नील नामक वन लागलें. तेथून चित्रकूटाचा मार्ग होता. त्या रात्रीं ते तेथे राहिले. सकाळीं उठल्यावर नदीच्या जलाला स्पर्श करून ते चित्रकूटाच्या मार्गाला लागले. नंतर कांही काळाने रामचंद्र सीतेला म्हणाले —

मातङ्गयूथानुसृतं पक्षिसंघानुनादितम्
चित्रकूटमिमं पश्य प्रवृद्धशिखरं गिरिम् ॥

नंतर ते पायींच चालत चालत चित्रकूटाला पोहोंचले.

ततस्तौ पादचारेण गच्छन्तौ सीतया सह
रम्यमासेदतुः शैलं चित्रकूटं मनोरमम् ॥

निर्णयसागर छापखान्याने तिलक टीकेसहित छापलेल्या रामायणाच्या आवृत्तींत भरद्वाजाश्रमापासून चित्रकूट पर्वत दहा कोस अंतरावर होता, असें म्हटलें आहे. तो श्लोक मागे दिला आहे. याशिवाय उत्तरभारतीय हस्तलिखितांवरून तयार केलेली रामायणाची आवृत्ति दयानन्द महाविद्यालय-संस्कृतग्रंथमालेंत छापली आहे. तींत हेंच अंतर तीन योजन सांगितलें आहे —

इति रामवचः श्रुत्वा भरद्वाजो महामुनिः
ध्यात्वा मुहूर्तमेकाग्रो रामं वचनमब्रवीत्
त्रियोजनमितस्तात गिरिर्यत्र निवत्स्यसि ॥

(अयोध्या. ५८, २९.)

हीं दोन्ही अंतरें जवळजवळ एकच (२० ते २४ मैल) आहेत. माझे स्नेही प्रो. जी. के. भट्ट हे ओरिएंटल इन्स्टिट्यूट, बडोदें, याच्या विद्यमाने भारताच्या भिन्नभिन्न भागांतून हस्तलिखितें जमवून रामायणाची चिकित्सित आवृत्ति काढीत आहेत. त्यांना मी अयोध्याकांड, सर्ग ५४, श्लो. २८-मधील याविषयीं विविध पाठ कळविण्याविषयीं विनंती केली होती. त्यांचें उत्तर आलें आहे. त्यांत त्यांनी वरील दोन पाठांखेरीज 'इतस्त्रियोजनाद्राम' असाहि पाठ असल्याचें कळविलें आहे. हा पाठ वरील दुसऱ्या पाठासारखाच आहे. परांजप्यांनी अनुमानिलेला 'शतक्रोश इतस्तात' हा पाठ कोठेच आढळत नाही. अत एव तो सर्वस्वीं निर्मूल आहे.

पुढे भरत आपले गुरु वसिष्ठ, मन्त्री, कौसल्यादि-माता, चतुरंग सेना इत्यादिकांसह रामाला परत अयोध्येला आणण्याकरिता जात असतां भरद्वाजाश्रमांत उतरला होता. तेव्हां भरद्वाजमुनींनी त्याला चित्रकूटाविषयीं पुढील माहिती सांगितली —

भरतार्धतृतीयेषु योजनेष्वजने वने
चित्रकूटगिरिस्तत्र रम्यकन्दरकाननः ॥

उत्तरं पार्श्वमासाद्य तस्य मन्दाकिनी नदी
पुष्पितद्रुमसंछन्ना रम्यपुष्पितकानना ।।
( अयोध्या. ९२, १०–११. )

दयानन्द महाविद्यालयाच्या आवृत्तींत व प्रा. भट्ट यांनी कळविल्याप्रमाणे इतर हस्तलिखितांतहि हेच श्लोक आढळतात. यांतहि तें अंतर अडीच योजनें किंवा वीस मैल सांगितलें आहे. तेव्हा एकंदरींत भरद्वाजाश्रमापासून चित्रकूट पर्वत २०–२२ मैल होता, असें दिसतें. सध्याचा कामताजवळचा चित्रकूट यापेक्षा बराच दूर सुमारें ६५ मैलांवर आहे. तेव्हा एकतर रामायणांतील अंतर अदमासाने दिलें असावें किंवा रामायणकाळीं सध्याच्या चित्रकूटापेक्षा प्रयागला बरीच जवळ असलेली टेकडी चित्रकूट म्हणून विवक्षित असेल. रामायणांतील इतर वर्णन मात्र सध्याच्या चित्रकूटाला जुळणारें असें आहे. तेथे टेकडीच्या पायथ्याशीं अनेक देवालयें आहेत. तेथे सदैव यात्रेकरूंची रीघ लागते. जवळच मन्दाकिनी-नामक नदी आहे. ती पैशुनी ( संस्कृत-प्रस्रविणी ) नदीला मिळते. तिचे अनेक धबधबे झाले आहेत. चित्रकूटाजवळ नैर्ऋत्यदिशेस सुमारें ९ मैलांवर गुप्त-गोदावरीनामक नदी एका गुहेंतून निघते. तिच्या धबधब्याने सभोंवारचा प्रदेश निनादित होतो. या नदीला उद्देशूनच कालिदासाने खालील श्लोक लिहिला असावा –

धारास्वनोद्‌गारिदरीमुखोऽसौ शृङ्गाग्रलग्नाम्बुदवप्रपङ्कः
बध्नाति मे बन्धुरगात्रि चक्षुर्दृप्तः ककुद्मानिव चित्रकूटः ।।

## चित्रकूटाचें स्थान

रघुवंशाच्या तेराव्या सर्गांत रामाला विमानांतून जातांना चित्रकूटपर्वत व त्याजवळची मंदाकिनी नदी दिसली, त्यांचें वर्णन आहे. तें या चित्रकूटाला जुळतें. कारण यानंतर अत्रिऋषीचा आश्रम ( जेथे अनसूयेने आपल्या प्रभावाने गंगा नदी आणली तो ) वर्णिला आहे. त्यावरून गंगानदीच्या जवळच चित्रकूट होता, यांत संशय नाही. रामायणाच्या युद्धकांडांत विमानांतून रामाला दिसलेल्या या प्रदेशाचें वर्णन पहा —

असौ सुतनु शैलेन्द्रश्चित्रकूटः प्रकाशते
अत्र मां कैकयीपुत्रः प्रसादयितुमागतः ।।
एषा सा यमुना रम्या दृश्यते चित्रकानना
भरद्वाजाश्रमः श्रीमान् दृश्यते चैष मैथिलि ।।
इयं च दृश्यते गङ्गा पुण्या त्रिपथगा नदी ।।
( युद्धकांड, १२३, ४९–५१. )

या सर्व उताऱ्यांवरून चित्रकूट हा गङ्गायमुना नद्यांपासून फार दूर नव्हता, हें उघड आहे. सध्याच्या चित्रकूटाचें अंतर रामायणांत सांगितलेल्या अंतरापेक्षा थोडें जास्त आहे खरें, पण तेवढ्यावरून चित्रकूट रामगडइतका दक्षिणेस असणें शक्य दिसत नाही. परांजपे म्हणतात, 'बुन्देलखंडांतल्या चित्रकूटाचें अंतर रामायणांतील वर्णनाशीं जमत नाही. मग तें १५० मैलांपर्यंत ताणून रामगडपर्यंत आणण्यास काय हरकत आहे?' 'रामगड प्रयागपासून १५० मैल आहे.' या विधानांतहि परांजप्यांची वकिली हातचलाखी दिसून येते. वास्तविक रामगडचें प्रयागपासून सरळ रेषेंत ( as the crow flies ) अंतर १५० मैल नसून २०० मैल आहे. कनिंगहॅमने आपल्या रिपोर्टांत हें स्पष्टपणें म्हटलें आहे. ( व्हॉ. २१, पृ. १३ ), रस्ते अगदी सरळ नसतात. त्यांना कित्येक वळणें असतात. तेव्हा

हें अंतर अडीचशें मैल होईल, असें कनिंगहॅमने म्हटलें आहे. वेग्लर तें २४० मैल आहे असें म्हणतो. असें असतांहि परांजपे तें अंतर १५० मैल सांगून वाचकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचा प्रयत्न करीत आहेत.

### रामगड चित्रकूट नव्हे

अडीचशें मैलांइतकें अंतर राम, सीता व लक्ष्मण रामायणांत वर्णिल्याप्रमाणे तीनचार दिवसांत पायीं चालून गेले असतील काय? तसेंच चतुरंग सेना, मन्त्री, कौसल्यादि-माता यांसह भरत रामाच्या शोधार्थ इतक्या दूर आला होता काय? तसेंच नन्दिग्रामाहून चित्रकूट सुमारें तीनशें मैल असता तर भरत वरचेवर येऊन आपणांस राज्य स्वीकारण्याचा आग्रह करील असें वाटून रामास चित्रकूटाजवळील आश्रम सोडून दक्षिणेंत दूर जावेसें वाटलें असतें काय? कालिदास म्हणतो —

रामस्त्वासन्नदेशत्वाद्भरतागमनं पुनः
आशङ्क्योत्सुकसारङ्गां चित्रकूटस्थलीं जहौ ।।

यांतील वर्णन रामगडास जुळतें काय, याचा वाचकांनी विचार करावा.

वरील विवेचनावरून पूर्वीच्या सिरगुजा संस्थानांतील रामगड हा चित्रकूट असणें सुतराम् अशक्य आहे, ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी स्पष्ट झाली असेल. रामगड मेघदूतांतील रामगिरि नव्हे, हें आम्ही मागेच सिद्ध केलें आहे. तेव्हां परांजप्यांचीं खालील दोन्ही समीकरणें असिद्ध झालीं आहेत —

रामगड = चित्रकूट
म्हणून रामगड = रामगिरि

मेघदूतांतील रामगिरि हा नागपूरच्या उत्तरेस सुमारें २७ मैलांवर असलेलें रामटेकच होय, हें आम्ही मेघाच्या मार्गावरून इतरत्र सविस्तर दाखविलें आहे. कालिदासकालीन परिस्थितीविषयीं जें अद्ययावत् संशोधन झालेलें प्रस्तुत लेखाच्या आरंभीं दिलें आहे त्यावरूनहि हेंच मत सर्वांत सयुक्तिक आहे, असें दिसून येईल. ● ● ●

# साहित्य-समीक्षा

## प्रा. रा. द. रानडे : चरित्र आणि तत्त्वज्ञान

गुरुवर्य डॉ. रामभाऊ रानडे यांना इहलोक सोडून गेल्या जूनमध्ये एक वर्ष पुरें झालें. त्यांच्या निधनाने अर्वाचीन काळांतील आंतरराष्ट्रीय कीर्ति पावलेले एक थोर महाराष्ट्रीय तत्त्वज्ञ व संत दिवंगत झाले असें म्हणणें युक्त होईल.

त्यांच्यासंबंधी ते निवर्तल्यावर कांहीं फुटकळ लेख वर्तमानपत्रांतून व मासिकांतून प्रसिद्ध झाले. पण त्यांना जाऊन उणेंपुरें वर्ष होण्याच्या आंत सांगलीचे श्री. दादासाहेब देशपांडे यांनी 'श्रीगुरुदेव रामभाऊ रानडे यांचें जीवनदर्शन' म्हणून अडीचशें पानांचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें; पण तें धावतें दर्शन एवढ्याच स्वरूपाचें आहे. 'दर्शन-परिषद्' अलाहाबाद विश्वविद्यालय हिने 'रानडेका दर्शन' म्हणून एक २३८ पानांचा गुरुदेवांच्या-विषयीचा लेखसंग्रह नुकताच प्रसिद्ध केला आहे. एक तर तो हिंदींत आहे व तो अनेक लोकांच्या निबंधांचें संकलन आहे. त्यांत विविध श्रेणींतील लोकांचे डॉ. रानड्यांची थोरवी सांगणारे लेख असल्याने डॉ. रानड्यांच्या थोरवीची उंची केवढी होती हें त्यावरून कळून येईल हें खरें; पण एकाच ग्रंथकाराने जीवन व तत्त्वज्ञान विस्तृतपणें मांडण्यांत जो एकसूत्रीपणा, रेखीवपणा येऊं शकतो तो या ग्रंथांत अर्थातच नाही. ही उणीव पुणें विद्यापीठांतील मराठी शाखेचे प्रमुख डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या प्रस्तुतच्या 'प्रा. रा. द. रानडे : चरित्र आणि तत्त्वज्ञान' या ग्रंथाने चांगलीच भरून निघणारी आहे आणि म्हणूनच या ग्रंथाचें मोल विशेष आहे.

'पांच संत कवि' या प्रसिद्ध पुस्तकाचे कर्ते डॉ. शं. गो. तुळपुळे हे संतवाङ्मयाचे अधिकारी लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. गुरुवर्य रानडे यांच्याप्रमाणेच तेहि निंबर्गीकर महाराजांच्या संप्रदायांतील एक आहेत. शिवाय गुरुवर्यांच्या सान्निध्याचा अनेक वर्षे त्यांना लाभहि झाला आहे. असे डॉ. शं. गो. तुळपुळे हे या जीवनचरित्राचे लेखक आहेत हा एक मणि-कांचनयोग म्हणतां येईल; आणि म्हणूनच हा चरित्रग्रंथ उत्कट उतरणें हेंच स्वाभाविक आहे. हा ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयांतील चरित्रग्रंथांत डॉ. तुळपुळे यांनी अमोल भर घातली आहे याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें आवश्यक आहे.

या ग्रंथाची विभागणी चार प्रकरणांत केली आहे व त्यास तीन परिशिष्टें जोडलेलीं आहेत. 'चरित्राची रूपरेषा' या प्रकरणास ७५ पानें, 'पारमार्थिक जीवन' या दुसऱ्या प्रकरणास ७८ पानें, 'आत्मसाक्षात्काराचें तत्त्वज्ञान' या प्रकरणास १०३ पानें व 'व्यक्तिमत्त्व'

---

**प्रा. रा. द. रानडे : चरित्र आणि तत्त्वज्ञान** – [ लेखक : **शं. गो. तुळपुळे,** मराठी विभाग, पुणें विद्यापीठ, पुणें. प्रकाशक : **स. कृ. पाध्ये, व्हीनस प्रकाशन,** ४१० शनिवार पेठ, पुणें २. पृ. ३३६+८, मूल्य ५ रुपये. ]



अनुक्रमणिका

या शेवटच्या प्रकरणास ६६ पानें खर्ची पडलीं आहेत. शेवटीं गुरुवर्य रानडे यांच्या घराण्याची वंशावळ, रामचंद्रवचनामृत व गुरुवर्यांच्या वाङ्मयाची सूची अशीं तीन परिशिष्टें देऊन हा ग्रंथ परिसमाप्त केला आहे.

या ग्रंथांत गुरुवर्यांचें चरित्र, तत्त्वज्ञान व आध्यात्मिक अनुभव या तीन गोष्टी दिलेल्या आहेत. त्यांचें आपणांस थोडक्यांत परीक्षण करावयाचें आहे.

अशा जातीच्या चरित्रविषयक लिखाणाचा विचार करतांना प्रथम चरित्र व तत्त्वज्ञान यांचीं मूल्यें कळण्याची पात्रता चरित्रलेखकाच्या अंगीं आहे किंवा नाही हें पाहणें जरूर आहे. कारण ढोबळ अनुवाद करण्याला जरी विशेष पात्रता लागत नसली, तरी यथार्थ कथन करणाऱ्या लेखकाच्या अंगीं विशेष पात्रता असावी लागते हें कोणीही कबूल करील. सर्वच शिल्पकार जरी सर्व प्रकारच्या मूर्ति तयार करूं शकत असले तरी पण मूर्तींचे असे कांही प्रकार आहेत की, त्या मूर्ति उत्कृष्ट होण्यास मूळ वस्तूशीं तादात्म्य पावण्याची शक्ति त्या शिल्पकाराजवळ असायला हवी. अशी समरसता अंगीं नसेल तर उत्कृष्ट मूर्ति तयार होणें कठीण आहे. हें झालें सामान्य शाब्दिक अथवा भौतिक मूर्तीसंबंधीं: पण जेथे तत्त्वज्ञानासारखा गहन व रूक्ष विषय आहे अथवा ‘आत्मप्रभा नित्य नवी। तेचि करोनि ठाण दिवी। इन्द्रियांते चोरोनि’ बघण्याचा अध्यात्माच्या अंतरंगातला विषय आहे, त्याचें कथन करण्यास विशेष प्रकारची पात्रता लागते हें समर्थन करण्याचेंहि कारण नाही. याबाबत अगदी साधें उदाहरण द्यावयाचें झालें तर असें देतां येईल की, सकाळच्या वेळीं कवडी सापडली तर महद्भाग्य समजून कपाळाला लावण्याइतका जो लोभी त्याला मोहरांचें ताट पुढे चालून आलें असतांना तें डावलून लावणाऱ्या तुकोबारायांच्या वैराग्याची कल्पना कशी येऊं शकेल?

चरित्रग्रंथाचें मूल्यमापन ठरवितांना आणखीहि कांही गोष्टी विचारांत घेणें आवश्यक आहे. त्या म्हणजे लेखकास चरित्रकथन करण्याबाबत आवश्यक तें संपूर्ण साहित्य उपलब्ध झालें आहे का? लेखकाने चरित्राचें कथन यथातथ्यपणें केलें आहे का? तो वर्णन करीत असलेल्या विषयास योग्य अशा भाषेचा त्याने उपयोग केला आहे का? चरित्रग्रंथाच्या विषयास साजेशी ग्रंथाची मांडणी आहे का? वगैरे. या चरित्रग्रंथाचें मूल्यमापन करतांना वरील कसोट्या लावल्यास चरित्राचें मूल्यमापन करणें सोपें जाईल असें वाटतें. म्हणून प्रस्तुतच्या ग्रंथास वरील कसोट्या लावून त्याचें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न करूं.

प्रस्तुत ग्रंथाचे लेखक डॉ. तुळपुळे हे संतवाङ्मयाचे गाढ अभ्यासू म्हणून प्रसिद्ध आहेत. ते डॉ. रानडे यांच्याच संप्रदायांतील असून त्यांना डॉ. रानड्यांचें सान्निध्य अनेक वर्षें घडण्याचें भाग्य लाभलेलें होतें हें वरती सांगितलेंच आहे. या गोष्टी विचारांत घेतां डॉ. तुळपुळे हे पहिल्या कसोटीस उतरतील हें न सांगतांहि कळण्याजोगें आहे.

डॉ. तुळपुळे हे गुरुवर्यांच्या घराण्यांतीलच एक असल्याने व रानडे-आश्रमाने त्यांचें सर्व लिखाण डॉ. तुळपुळ्यांना उपलब्ध करून दिल्यामुळे दुसऱ्याहि कसोटीस त्यांचा ग्रंथ उतरेल यांत शंका नाही. डॉ. तुळपुळे यांना नुसतीं कागदपत्रें मिळालीं असतीं तरीसुद्धा त्यांच्या आधारावर गुरुवर्यांचें चरित्र ते उत्कृष्ट रीतीने लिहूं शकले असते असें त्यांनी आजवर केलेल्या लिखाणावरून सहज म्हणतां येईल. अशा स्थितींत त्यांना गुरुवर्यांच्या निंबाळ, अलाहाबाद, पुणें इत्यादि ठिकाणीं ज्या बैठकी दिवसारात्रीं होत त्यांना अनेक वर्षें उपस्थित राहण्याची संधि मिळाली होती. त्यामुळे त्यांच्या या ग्रंथाच्या लिखाणास साहजिकच एक-प्रकारचा जिवंतपणा आलेला आहे. या ग्रंथाची भाषा प्रसादयुक्त, ओघवती व संतवाङ्मयांतील पारमार्थिक रसाने ओथंबलेली अशी आहे. यामुळे हा चरित्रग्रंथ उत्कृष्ट असा झाला आहे.

या ग्रंथाचीं चार प्रकरणें आहेत. त्यांपैकी 'पारमार्थिक जीवन' हें दुसरें प्रकरण हेंच खरें महत्त्वाचें आहे. कारण पहिल्या प्रकरणांत गुरुवर्यांच्या मांसवंशाचा वृत्तान्त-व्यावहारिक जीवनाचा इतिहास-त्यांचें जन्मस्थान, बालपण, शिक्षण, नोकरी, आजार इत्यादि-दिलेला आहे. त्यांतील कांही गोष्टी, उदाहरणार्थ, मॅट्रिकला जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप मिळविणें, बी. ए. पर्यंत तत्त्वज्ञानविषयाशीं संबंध नसतांनासुद्धा व घोर आजारीपणांतून जाऊनसुद्धा तत्त्वज्ञानासारख्या किचकट व रूक्ष विषयांत पहिल्या वर्गांत उत्तीर्ण होऊन—नुसतें उत्तीर्ण नव्हे, परीक्षकालासुद्धा नवीन वाचावयाला मिळेल अशी माहिती देऊन—विलोभनीय असें चॅन्सलर्स मेडल् मिळविणें इत्यादि गोष्टी निःसंशयच कौतुकास्पद आहेत. पण असा बौद्धिक जीवनाचा उत्कर्ष असणारीं इतरहि बुद्धिमान् माणसें आहेत. गुरुवर्यांचा खरा मोठेपणा या बुद्धिमत्तेचा उपयोग त्यांच्याच भाषेंत सांगावयाचें म्हणजे, 'परमार्थ संपादन करण्यांत व वाढविण्यांत' त्यांनी केला याच्यांत आहे. कै. चिंतामणराव वैद्य यांनी लोकमान्यांच्याविषयी बोलतांना एकदा असे उद्गार काढले होते की, परीक्षा उत्तीर्ण होणें व त्यांत उच्च श्रेणींत यश मिळवणें या दृष्टीने बघतां मी लोकमान्यांच्यापेक्षा मोठा ठरण्याचा संभव आहे; पण लोकमान्यांचा खरा मोठेपणा याच्यांत आहे की, असामान्य बुद्धि असून तिचा उपयोग त्यांनी देशाच्या उद्धारासाठी केला ! तसेंच थोड्या फरकाने गुरुवर्यांच्यासंबंधाने म्हणतां येईल. त्यांचा खरा मोठेपणा ते असामान्य बुद्धीचे होते, त्यांची स्मरणशक्ति दांडगी होती याच्यांत नव्हे, तर त्या स्मरणशक्तीचा उपयोग 'देखिलेनि पदार्थें । आठवोनि दे मातें ।' अशी अखंड देवाची स्मृति राखण्यांत त्यांनी केला याच्यांत आहे. हें सर्व त्यांनी ज्या प्रकारचें जीवन घालवून केलें, त्याकरिता जी तयारी केली त्याचा इतिहास दुसरें प्रकरण 'पारमार्थिक जीवन' यांत आहे. यामुळे पहिलें प्रकरण सर्व ७५ पानांत आटपून डॉ. तुळपुळे यांनी पारमार्थिक जीवन, साक्षात्कार व व्यक्तिमत्त्व याकरिता जवळजवळ २५० पानें खर्च केलीं आहेत हें योग्यच आहे यांत शंका नाही.

प्रस्तुत ग्रंथाचे लेखक डॉ. तुळपुळे हे संतवाङ्मयांत किती मुरलेले आहेत हें या ग्रंथाचें कोणतेंहि पान जो उघडील त्यास दिसेल असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होईलसें वाटत नाही. गुरुवर्यांचें चरित्र त्यांनी मराठींतील ज्ञानेश्वरी, दासबोध, तुकारामबोवांचा गाथा व हिंदी-कानडी संत यांच्या शब्दांतूनच जवळजवळ दिलें आहे असें म्हटल्यास हरकत नाही. या पद्धतीचा एक फायदा वर म्हटल्याप्रमाणे प्रस्तुत चरित्रलेखकाचा संतवाङ्मयाशीं केवढा गाढ परिचय आहे हें न सांगतांच सिद्ध होईल हा आहे. पण याहीपेक्षा खरा व मोठा फायदा म्हणजे ज्यांच्या चरित्राचें कथन केलें आहे ते गुरुवर्य रामभाऊ हे खरेच संत होते याबाबत वेगळा पुरावा आणण्याचें कारणच नाही. डॉ. तुळपुळे यांनी उपयोगांत आणलेलीं संतवचनें हीं रामभाऊंचें यथातथ्य वर्णन करणारीं आहेत येवढेंच ठरविलें म्हणजे संपलें ! ज्यांना गुरुवर्यांचा थोडाहि परिचय आहे ते सांगूं शकतील की, लेखकाने आपल्या संप्रदायांतील रामभाऊ आहेत अथवा आपणांस ते गुरुस्थानीं आहेत म्हणूनच त्यांचें वर्णन करतांना मोठालीं संतवचनें उपयोगांत आणलीं आहेत असें नव्हे. जसा वसंत ऋतु हा एक कोकिळ गाऊं लागल्याने निर्माण होत नाही, नीतिमत्ता ही कांही एका सत्कार्याने ठरत नाही, त्याप्रमाणे संतत्व हें कांही वीज चमकल्याप्रमाणे सहजीं घडून आलेल्या एखाद्या साक्षात्काररूप घटनेने बनत नाही. संतत्व म्हणजे देवाचें नुसतें व्याख्यान नव्हे अथवा नुसती देवस्वरूपाची बौद्धिक कल्पना नव्हे. तो देवाचा अनुभव आहे व त्या अनुभवाचा गुरुवर्यांनीच Mysticism in Maharashtra या पुस्तकांत म्हटल्याप्रमाणे, जीवनाच्या सर्व क्षेत्रावर-जागृतादि सर्व अवस्थेवर व त्या अवस्थेतील संवेदनादि सर्व क्रियांवर परिणाम होतो व हा परिणाम टिकाऊ असतो. दैवी अथवा ब्राह्मी जीवन (Divine life)

प्राप्त झालें असतां ज्ञानी पुरुषाचें जीवन वर्षानुवर्ष किंबहुना अंतकालपर्यंत विशिष्ट दर्जाच्या पातळीवरूनच चालतें. ' एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । ' अशी स्थिति असल्यामुळे गुरुवर्यांच्या पारमार्थिक जीवनाचा एकदोन दिवसांचा नव्हे, चाळीस वर्षांचा इतिहास देत असतांना व तो ' नामूलं लिख्यते किंचित् ' या पद्धतीने देत असतांना तो जर संतवचनांचा उपयोग करून देतां आला तर गुरुवर्य संत होते याला वेगळा पुरावा देण्याचें कारणच नाही. हें काम डॉ. तुळपुळे यांनी उत्कृष्ट रीतीने केलें आहे, हें या ग्रंथाचें 'पारमार्थिक जीवन ' हें दुसरें प्रकरण जो वाचील त्यासच कळेल.

या ग्रंथाचें दुसरें प्रकरण या ग्रंथाचा गाभा आहे असें जें वर म्हटलें आहे त्याचें आणखी एक कारण देण्यासारखें आहे व तें म्हणजे अध्यात्म हें प्रयोगशास्त्र आहे. त्यांतील प्रमेयें ( theories ) ज्या घटनांवर ( facts ) उभारलेलीं असतात त्या घटना म्हणजे साधकांचे आध्यात्मिक क्षेत्रांतील अनुभव होत. तिसऱ्या प्रकरणांत दिलेले जे अध्यात्मशास्त्रविषयक विचार आहेत त्यांचा आधार गुरुवर्यांचें प्रत्यक्ष आध्यात्मिक जीवन होय. ' अनुभवें आलें आंगा । तें या जगा देतसे ।' असें जसें तुकारामबोवा म्हणतात तसेंच डॉ. रानडे म्हणतात–' मीं अनुभवली नाही अशी एकहि गोष्ट मीं ग्रंथांत सांगितली नाही. ' डॉ. रानड्यांच्या जीवनांतील अशा अनुभवाच्या गोष्टी दुसऱ्या प्रकरणांत दिल्या असल्याने तिसऱ्या प्रकरणाचा आधार दुसरें प्रकरणच आहे.

शेवटच्या प्रकरणांत दिलेलें डॉ. रानड्यांचें व्यक्तिमत्त्व हेंहि त्यांनी जें आध्यात्मिक जीवन घालविलें त्याचाच आविष्कार आहे. यामुळेच आमच्या दृष्टीने या सर्व पुस्तकाचा गाभा म्हणजे या ग्रंथाचें दुसरें प्रकरण ' पारमार्थिक जीवन ' हें होय.

आत्मसाक्षात्कार झाल्यावरहि डॉ. रानडे हे आठ आठ तास साधन करीत. यासंबंधी ते एकदा म्हणाले, ज्ञानेश्वरांनी म्हटलें आहे ' जिये मार्गींचा कापडी महेश अर्जुनी. ' डॉ. रानड्यांचें पारमार्थिक जीवन म्हणजे साधकास उत्कृष्ट आदर्श. ' बोलिले जे ऋषि साच भावें वर्ताया ' या तुकोबारायांच्या उक्तीप्रमाणे डॉ. रानड्यांचें जीवन म्हणजे संतवाङ्मयांत साधकाची दशा कशी असावी याचें जें वर्णन केलें आहे त्याचें मूर्तिमन्त स्वरूप. ह्यांच्यासारख्याचें जीवन म्हणजे अध्यात्मशास्त्रावरील ग्रंथ. हे नुसत्या पोकळ कल्पनांनी भरलेले ग्रंथ नव्हेत, तर जीवनांतील शक्य अशा घटनांनी सजविलेल्या जीवनाचे आदर्श आहेत हें सिद्ध करणारें असतें. डॉ. रानड्यांच्या साधकदशेंतील खान, पान, ध्यान इत्यादिकांचें उत्कृष्ट वर्णन डॉ. तुळपुळे यांनी केलें आहे. प्रस्तुत लेखकासहि त्यांच्या जीवनाचें दर्शन जवळून घेण्याचें भाग्य लाभलेलें असल्यामुळे, त्यांच्या या सिद्धसाधकदशेकडे बघून त्यास ज्ञानेश्वरांच्या पुढील ओव्यांची आठवण होई व त्यांतील दिलेल्या साधनाचा खरेपणा पटे. म्हणून त्या ओव्याच खाली द्याव्याशा वाटतात :

शमदमादिकीं खेळे । न बोलणेंचि चावळे ।
गुरुवाक्याचेनि मेळें । नेणे वेळु ॥
आणि आंगा बळ यावें । नातरी क्षुधा जावें ।
कां जीभेचें पुरावे । मनोरथ ॥
भोजन करितां विखीं । यया तिहींतें न लेखी ।
आहारीं मिती संतोषी । माप न सूये ॥
अनशनाचेनि पावकें । हारपतां प्राणु पोखे ।
याचि भागु मोटकें । अशन करी ॥
आणि परपुरुषें कामिली । कुळवधू आंग न घाली ।
निद्रालस्या न मोकली । अशन तैसें ॥

दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं इन अंग लागे ।
वांचूनि येर नेघे । राभस्य तेय ॥
देहनिर्वाहापुरतें । राहाटवी हातापायांतें ।
किंबहुना आपैतें । सबाह्य केलें ॥
ज्ञाने. १८–१०२२ ते २९.

गुरुवर्यांच्या पारमार्थिक जीवनाचा आत्मा म्हणजे गुरूपासून प्राप्त झालेलें सबीज नाम. निष्ठावंत भाव, निरंतर दीर्घकालपर्यंत केलेलें अनुष्ठान व त्याकरिता करावा लागलेला त्याग हें खतपाणी घालून त्यांनी त्या बीजाचा ' मोगरा फुलला मोगरा फुलला । फुलें वेचितां अतिभारु कळियासि आला ॥ ' एवढा विस्तार केला. श्रीएकनाथांनी म्हटलें आहे, ' जया परमार्थाची चाड । तेणें सांडावें लिगाड । धरोनि प्रपंचाची चाड । नित्यनेम आदरें ॥ ' याप्रमाणें गुरुवर्यांनी ' नियम ' चाळीस वर्षांवर केला व ' देवाचा साक्षात्कार ' हें जें आपलें जीवितसाफल्य तें साध्य करून घेतलें. या जीवनास लागणारी जी अंतर्बाह्य तयारी ती त्यांनी कसोशीने मिळविली. परदेशांत जाऊन कीर्ति मिळण्याची शक्यता असतांनासुद्धा सामाजिक जीवन ( Social life ) म्हणून ज्याला म्हणतात त्याचा त्यांनी त्याग केला. अंतरांत दैवी संपत्तीचे गुण बाणविण्याचा प्रयत्न केला. अशा रीतीने प्रकृतीचें आनुकूल्य नसतांना किंबहुना ती अखंड विघ्न आणीत असतांना परमार्थाच्या आड येणाऱ्या विघ्नांशीं सात्त्विक धैर्याच्या आणि गुरु व देव यांवरील अनन्यनिष्ठेच्या जोरावर लढत देऊन ( रात्रिदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ) आपला मुक्काम ( न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योति । आनंदलहरींची गति ) त्यांनी गाठला. त्यांचें जीवन म्हणजे आदर्श साधकाचें जीवन होय यांत शंका नाही. याचेंहि वर्णन डॉ. तुळपुळे यांनी दुसऱ्या प्रकरणांत यथातथ्य केलें आहे.

येथवर चरित्रासंबंधी सांगितलें. आता त्यांच्या तत्त्वज्ञानाकडे वळूं. डॉ. रानड्यांच्यासंबंधीच्या या ग्रंथाचें नांव जरी चरित्र आणि तत्त्वज्ञान असें असलें व आत्मसाक्षात्काराच्या प्रकरणास सर्वांत जास्त पानें खर्चीं पडलीं असलीं तरी डॉ. रानडे यांच्या खुद्द जीवनांत द्वैत, अद्वैत, सगुण, निर्गुण, माया इत्यादि तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत नेहमी आढळून येणाऱ्या तार्किक चर्चेस फारसें मोठें स्थान नव्हतें; व ही गोष्ट डॉ. तुळपुळे यांनीहि आपल्या ग्रंथांत सांगितली आहे. ही चर्चा अथवा याविषयींचें लिखाण पारमार्थिक वृक्षाचें कुंपण असें ते समजत. आत्मसाक्षात्कारी तत्त्वज्ञानाचें स्वरुप म्हणजे ' प्रचीतिरूप ', ' अनुभवरूप ' असल्याने त्यांत वादविवादाला जागा फारशी नाहीच. तो चाखून पाहायचा आहे. आपण ज्याला सामान्यतः तात्त्विक चर्चा म्हणतों त्यांत अनुभवापेक्षा त्या अनुभवावरून बौद्धिक सिद्धान्त बांधणें या गोष्टीचाच पुष्कळसा भाग येतो, व त्यांत सर्वांचेंच एकमत होईल असें सांगतां येत नाही. कारण सिद्धान्त बांधण्यांत कारणमीमांसा येते व ही मीमांसा ती करणाऱ्याच्या बुद्धीची खोली, अनुभवाची विशालता व हें सर्व व्यक्त करण्यास आवश्यक लागणारी शब्दसंपत्ति, कल्पनेची भरारी इत्यादि सामग्रीची जवळीक कारणमीमांसा करणाऱ्याजवळ किती असेल त्यावर अवलंबून आहे. यामुळे तिसरें प्रकरण हें जरी महत्त्वाचें असलें तरी त्यांतील जो तत्त्वज्ञानाचा भाग आहे तो विवाद्य स्वरूपाचा राहणार हें स्वाभाविक आहे. उदाहरणार्थ, गुरुवर्य रानडे ज्यांना वस्तु, आत्मा असें म्हणतात, त्या वस्तूची अथवा आत्म्याची स्पष्ट व्याख्या त्यांनी फारच थोड्या ठिकाणीं दिली आहे व त्यांनी जी व्याख्या दिली आहे ती सर्व तत्त्वज्ञानी मान्य करतीलच असें नाही.

शिवाय गुरुवर्यांचेंच म्हणून कोणतें तत्त्वज्ञान हें त्यांच्या ग्रंथांतूनच काढावयाचं म्हटलें तर त्यांनी आपल्या ग्रंथांत जी एक मांडणीची विशेष पद्धति अवलंबिली आहे त्यामुळें तें काम थोडें कठीण होऊन बसतें. त्यांनी आपल्या लिखाणांत बहुतेक ठिकाणीं तुलनात्मक व ऐतिहासिक पद्धतीचें अवलंबन केलें आहे. ही पद्धत म्हणजे ग्रंथकाराच्या लिखाणाची विषयवार विभागणी करून, वेगवेगळ्या विभागांचे प्रदर्शक भाग निवडून काढून, त्यांची व्यवस्थित मांडणी करून, ग्रंथकाराच्या शब्दांतच त्याचें म्हणणें मांडणें. ही जी पद्धति उपयोगांत आणली जाते व जी त्यांनी आपल्या बहुतेक ग्रंथांत उपयोगांत आणली आहे तींत जसे कांही फायदे आहेत तसे तोटेहि आहेत. ग्रंथकाराचें मत त्याच्याच शब्दांत सांगितलें असल्याने, ग्रंथकाराच्या मतासंबंधीं वाचणाराच्या मनांत शंका राहत नाही हा जरी एक फायदा असला, तरी त्याबरोबर एकदोन तोटेहि होतात. एक तोटा असा की, ग्रंथकार हा मांडणी करीत असतांना, आपल्याला ग्रंथकाराच्या मतांचें जें स्वरूप लोकांना पटवावयाचें आहे त्यास सुसंगत अशा वेच्यांची निवड करूं शकतो. यामुळे निवड करणारा हा निःपक्षपातीबुद्धीने करणारा नसला व तो जर पूर्वग्रहाने विद्ध असला तर ग्रंथकाराच्या शब्दांत मांडणी केली असूनहि ग्रंथकाराचें हृदय वाचकांसमोर मांडलें जाईलच असें सांगतां येत नाही. पूर्वग्रहांमुळे आपल्या मतांशीं विसंगत असणारा असा कांही भाग गाळला जाण्याचाहि संभव असतो. या पद्धतीने मांडणी झालेल्या विषयाचें मूल्य किती आहे हें मांडणी करणाऱ्याच्या ठिकाणीं तटस्थ वृत्ति व प्रामाणिकपणा ज्या प्रमाणांत असेल त्यावर अवलंबून राहील.

यांतील दुसरा तोटा म्हणजे मांडणी करणाराचें मत हें नेहमी अनुमितच राहणार व त्यामुळे त्याच्याविषयीं संदिग्धताच राहणार. झाडाच्या पानाआडून जशी फुलाची कळी डोकावावी त्याप्रमाणे दुसऱ्या ग्रंथकाराच्या शब्दाआडून मांडणी करणाराचें मत डोकावत असतें. यामुळे वर म्हटल्याप्रमाणे मांडणी करणाराचें मत निःसंदिग्धपणें कळणें कठीणच होऊन बसतें.

गुरुवर्यांचे जे नामांकित ग्रंथ–(1) Constructive Survey of the Upanishadic Philosophy, (2) Mysticism in Maharashtra, (3) Pathway to God in Hindi Literature इत्यादि ग्रंथ आहेत ते स्वतंत्र ग्रंथ नाहींत. भारतीय तत्त्वज्ञानांतील मोठ्या टप्प्यांचा इतिहास विवक्षित पद्धतीने मांडून त्यावर नवा प्रकाश पाडणारे असे हे ग्रंथ आहेत. जुन्या ग्रंथांवर नवा प्रकाश पाडणाऱ्याच्या ठिकाणीं जें विचाराचें नावीन्य (originality) असावें लागतें तें गुरुवर्यांच्या ठिकाणीं भरपूर होतें. त्या दृष्टीने हे ग्रंथ अमोल आहेत. उपनिषदांवरील आपला ग्रंथ लिहून डायसनसारख्या उपनिषदांवरील अधिकारी पाश्चिमात्य लेखकासहि नवी दृष्टि दिली ही कामगिरी कमी मोलाची असें कोण म्हणेल ? त्याचप्रमाणें मराठी, कानडी, भाषेंत लिखाण करणारे संतकवि यांच्या ग्रंथाची मांडणी शास्त्रीय पद्धतीने करून त्यांच्या साक्षात्कारी तत्त्वज्ञानास उजळा दिला व तद्द्वारा मराठींतहि अध्यात्मशास्त्र निर्माण केलें ही कामगिरीहि लहान नाही. ज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, तुकोबांचा गाथा अथवा इतर नामदेवादि संतकवींचे ग्रंथ हे सर्व आध्यात्मिक विचाराने पूर्ण भरलेले आहेत. पण त्यांपैकी कोणीहि आपल्या ग्रंथांतून साक्षात्काराचें अथवा अध्यात्माचें शास्त्र निर्माण केलें नाही. जसें या संतांच्या ग्रंथांतून भक्ति आहे, काव्य आहे पण यांपैकीं कोणीहि भक्तिशास्त्र निर्माण केलें नाही; अथवा एक समर्थ सोडले तर कोणीहि काव्यशास्त्र निर्माण केलें नाही. संस्कृतांत, इंग्रजींत अध्यात्मशास्त्राची प्रक्रिया सांगणारे ग्रंथ आहेत. मराठींत गुरुवर्यांच्या ग्रंथांच्या पूर्वीं 'प्रणवोपासना' अथवा 'साधूंचा देवयान पंथ' असे तुरळक ग्रंथ होते. पण गुरुवर्यांनी प्रमुख महाराष्ट्रीय संतांच्या वेंचे-उक्तींची निवड करून छापतांना ज्या प्रस्तावना

लिहिल्या त्यांच्याद्वारे, अथवा त्यांचीं जीं मराठींत वेगवेगळीं व्याख्यानें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांच्या द्वारे साक्षात्कारी अध्यात्मशास्त्राची पूर्ण प्रक्रिया देऊन विस्तृत अशी मराठींत प्रथमच मांडणी केली असें म्हटल्यास हरकत नाही. ही मराठींतील अध्यात्मक्षेत्रांतील त्यांची देणगी अमोलिकच आहे असेंच कोणी म्हणेल.

पण इतकें लिहूनसुद्धा असें म्हणणें भाग पडतें की, बर्गसानचे Creative Evolution अथवा श्री. अरविंदांचें Divine Life यांसारखा तत्त्वज्ञानावरील स्वतंत्र ग्रंथ गुरुवर्यांच्याकडून लिहिला गेला नाही; व याचें मुख्य कारण वर म्हटल्याप्रमाणे ते तत्त्वज्ञानाच्या चर्चेपेक्षा आध्यात्मिक अनुभवालाच अधिक महत्त्व देत. गुरुवर्यांच्या ग्रंथांतून त्यांना मान्य असलेलें म्हणून जें तत्त्वज्ञान आढळून येतें त्याला बौद्धिक रहस्यवाद अथवा प्रचीतिवाद (Rational Mysticism) म्हणतां येईल. एका लेखकाने त्यास आनंदवाद असेंहि म्हटलें आहे. मिस् अंडरहिल या विदुषीने म्हटल्याप्रमाणे जगांतील सर्व जोगी एकच भाषा बोलतात. मग उपनिषदें, संतवाङ्मय यांचा अभ्यास व यांच्यांत सांगितलेल्या आध्यात्मिक अनुभवाशीं जुळता आपला अनुभव यांच्यावर उभारलेलें तत्त्वज्ञान सर्वांशाने नवीन असणेंच शक्य नाही. गुरुवर्यांच्या तत्त्वज्ञानासंबंधानेसुद्धा असेंच म्हणावें लागेल. त्यांनी सांगितलेला बौद्धिक रहस्यवाद अथवा प्रचीतिवाद हा अगदी नवीन आहे असें नाही. तर

'विचार आपुलें काम। टाकुनि साधी ते धाम॥' अथवा

'निर्धारेंसी विचारूं। निमोनि झाला साचारू। स्वामीच्या संकटीं गुरू। सुभट्ट जैसा॥'

यासारख्या संतोक्तींत तो आलेलाच आहे. त्यांच्या अध्यात्मक्षेत्रांतील कामगिरीचा एक पैलू वर दिला आहे. त्यांनी साक्षात्कारी महात्म्यांच्या ग्रंथांकडे पहाण्याची दृष्टि दिली. त्यांतील तत्त्वज्ञानास उजाळा दिला. पण त्यांच्या या क्षेत्रांतील कामगिरीचा आणखी एक पैलू देण्यासारखा आहे. तो म्हणजे हें जें भारतीय साक्षात्कारी तत्त्वज्ञान आहे तें अर्वाचीन काळांतील झालेली भौतिक विज्ञानाच्या व मानसादि आध्यात्मिक शास्त्राच्या वाढीशीं व पाश्चिमात्य सुधारलेल्या देशांतील विद्यमान व दिवंगत असलेले तत्त्वज्ञ यांनी बुद्धीच्या जोरावर काढलेले निष्कर्ष यांच्याशीं तोलून, एका अर्थाने तें नवीन कसोट्यांवर घासून, तें बावनकशी सोनेंच कसें ठरतें असें सिद्ध करण्यांत आहे. गुरुवर्यांनी नागपूर येथे भरलेल्या तत्त्वज्ञानाच्या परिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांत आपले बिंदुवेंच ( Spiriton ) म्हणून जें तत्त्वज्ञान सांगितलें तें अथवा त्याची मांडणी बघितली तर वरती आम्ही जें लिहिलें आहे त्यालाच पुष्टि मिळेल.

गुरुवर्यांच्या तत्त्वज्ञानाचा आध्यात्मिक अनुभव हा गाभा असल्यामुळे व पौर्वात्य व पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास त्यांनी त्यांची मूलगामी व सूक्ष्म बुद्धि उपयोगांत आणून केलेला असल्यामुळेच, पश्चिमी बुद्धिवाद व आमच्याकडील आध्यात्मिक अनुभव यांचा समन्वय ते करूं शकले. त्याचप्रमाणे नव्याजुन्याचाहि मेळ त्यांना घालतां आला. गुरुवर्यांच्या ठिकाणीं नव्याजुन्याचा अपूर्व सुंदर मिलाफ, त्यांचो असामान्य बौद्धिक उंची व त्याच्या जोडीला ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे 'श्रीमंत' अनुभवामृताची जोड मिळाल्याने आधुनिक बुद्धिवादी युगांत अनेक अर्वाचीन सुशिक्षितांमध्ये ते परमार्थासंबंधी श्रद्धा निर्माण करूं शकले व त्यांना हा पारमार्थिक आनंदाचा लाभ देऊं शकले. जातां जातां एक गोष्ट नमूद करणें अवश्य वाटतें. गेल्या दहाबारा वर्षांत डॉ. रानड्यांचा कीर्तिसुगंध व्याख्यानद्वारे व ग्रंथद्वारे पसरण्यास गुरुवर्यांचा श्रीमंत राजेसाहेब सांगली, यांच्याशीं गेल्या दहा वर्षांत आलेला संबंध बऱ्हंशीं कारणीभूत झाला. दिनांक २६।१०।१९४७ रोजीं अध्यात्म-विद्यामंदिराची स्थापना झाली. अध्यात्मविद्यापीठ स्थापन होऊन जरी बरींच वर्षे झालीं होतीं तरी त्याचें स्थगित राहिलेलें

कार्य श्रीमंत राजेसाहेब सांगली, यांच्या उदार साहाय्याने पुन्हा जोराने सुरू झालें व अध्यात्म-वृक्ष अधिक जोरानें वाढीस लागला. त्याची वाढ कसकशी होत गेली ही माहिती अधिक दिली असती तर बरें झालें असतें. त्याचप्रमाणे निंबाळ येथे गुरुवर्यांचा वास असतांना त्या ठिकाणीं पारमार्थिक वसाहत व्हावी अशा दृष्टीने कांही प्रयत्न झाले असल्यास त्यांचाहि उल्लेख चरित्रांत आला असता तर आश्रमवाढीच्या दृष्टीने त्याचाहि उपयोग झाला असता.

डॉ. तुळपुळे यांचा हा ग्रंथ म्हणजे ' रानडे-आश्रम ग्रंथमालें'तील पहिलें सुगंधी पुष्प आहे. रानडे-आश्रमांत अशाच तऱ्हेचीं विश्रांत आत्मानंदाचा सुवास दरवळणारीं आध्यात्मिक पुष्पें निर्माण करणारीं झाडें लावलीं जातील अशी योजना आश्रम करील अशी आशा आहे. ● ●

शं. वा. दांडेकर

## सुश्लोकमानस

हिंदी साहित्यांत श्रेष्ठ संत व रससिद्ध कवि म्हणून गोस्वामी तुलसीदासजींचें स्थान एकमेवाद्वितीयम् आहे. त्यांनी रामचरित्राचा आधार घेतला आणि मानवी जीवनाची संपूर्ण व व्यापक समीक्षा केली. ही समीक्षा करीत असतांना त्यांचें लक्ष लोकशिक्षणाकडेहि होतें. त्यांनी मानवी जीवनांत त्रिकालाबाधित आदर्श निर्माण केले आणि या आदर्शांच्या पार्श्वभूमीवर ' भक्ती ' चें असें उठावदार विवरण केलें कीं, जें त्या काळच्या धार्मिक अव्यवस्थेंत मार्गदर्शक ठरलें. या ' भक्ती ' ला ' नीती ' ची जोड होती. त्यामुळे गोस्वामी तुलसीदासजींचें ' रामचरित-मानस ' हें काव्य विश्वव्यापी विचारांच्या विवेचनाचें निधान ठरलें, आणि त्याच्या निर्माणामुळे हिंदी साहित्याचें सौभाग्य उजळलें.

अशा या अलौकिक 'ग्रंथराजा' चा श्लोकबद्ध मराठी अनुवाद डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांनी तीन भागांत पूर्ण केला आहे. तो निव्वळ वाचनीय किंवा मननीयच नाही, तर संग्रहणीय आहे. गोस्वामीजींच्या ' मानसा ' ला ' नानापुराणनिगमागमशास्त्र ' यांचा आधार असला, तरी तें प्रामुख्याने ' वाल्मीकि रामायणा ' वर आधारित आहे. या रामायणाचा दृष्टिकोन लौकिक आहे, आणि त्यामुळे तें धार्मिक अंधविश्वास व अतिरेकी भावाभिनिवेश यांपासून मुक्त आहे. त्यांत आरंभापासून अंतापर्यंत राम हा एक वीर पुरुष आहे. तो अवतार नाही. महम्मदीयांच्या आक्रमणाच्या काळीं जेव्हां धार्मिक अनवस्था ओढवली, तेव्हा महात्मा रामानंद यांनी या वीर पुरुषावर देवत्वाचा आरोप करून विष्णूच्या उपासनेचें क्षेत्र विस्तृत केलें आणि देवपूजेबरोबर हिंदु धर्मांत वीरपूजेचाहि अंतर्भाव करून घेतला. त्यांच्या या महत्त्वाच्या सुधारणेलाच पुढे तुलसीदासजींच्या ' रामचरितमानसा'चें फल आलें. तुलसीदासांपूर्वी उत्तर-भारतांत महम्मदीयांच्या ' सूफी मता ' चा फैलावा होत होता. त्यासाठी अवधी भाषेंत मालिक महम्मद जायसी याचा ' पद्मावत ' हा ग्रंथहि सिद्ध झाला होता. त्यांतील ' चौपाया ' व ' दोहे ' यांचा क्रम व बांधणी लक्षांत घेऊन गोस्वामीजींनी आपला ग्रंथ तयार केला आणि इस्लामच्या प्रसारास पायबंद घातला. त्याचा परिणाम असा की, बंगाल व पंजाब यांत हिंदूंच्या

सुश्लोकमानस (भाग १।२।३)–[ अनुवादक–डॉ. रा. चिं. श्रीखंडे, श्रीतुलसीमंजरी, मंगळवार, कोल्हापूर. पृ. अनुक्रमें १७५।१९६।१७९, मू. प्रत्येकीं रु. ५. ]

बरोबरीने मुसलमानांची संख्या वाढली, तरी ज्या प्रदेशांत 'रामचरितमानसा' चा पाठ होत होता, त्या मधल्या उत्तर प्रदेशांत ती संख्या कमीच राहिली.

अशा या अजरामर ग्रंथाला मराठींत उतरून डॉ. श्रीखंडे यांनी महाराष्ट्र वाङ्मयाचें मुखमंडल उजळलें आहे. त्यामुळे अभेद्य हिंदुत्व, उज्ज्वल ध्येयवाद, आदर्श समाजजीवन, अमोघ मानसशास्त्रीय ज्ञान, निर्दोष चरित्रचित्रण, उत्कृष्ट कलात्मकता आणि उत्कट भाषा यांचा परिचय वाचकांस होणार आहे. याबरोबरच वेधक वर्णनपद्धति आणि कुतूहलोत्पादक कथनकौशल्य यांमुळे रामकथेच्या ओघाओघांतच वाचकांस उपयुक्त व उपकारक नीत्युपदेश प्राप्त होणार आहे. रामकथा सांगतांना तुलसीदासजींचा दृष्टिकोन 'सियाराममय सब जग जानी । करहुँ प्रनाम जोरि जुगपानी ' असा विश्वव्यापक होता; तसाच तो डॉ. श्रीखंड्यांचा आहे.

तुलसीदासजींचा कलात्मक विशेष असा की, रामासारख्या राजाचें चित्र त्यांनी जितक्या तन्मयतेने रेखाटलें आहे, तितक्याच तन्मयतेने हनुमानासारख्या सेवकाचें व गुहासारख्या निषादाचें चित्रहि रेखाटलें आहे. वानगीदाखल हें प्रसंगचित्र पहा. वनवासी राम सीता व लक्ष्मण यांसह वनांत विहरत असतांना कांहीं किरात स्त्रिया सीतेला त्या तिघांची माहिती पुसतात. किरातिणींचा निरागसपणा, सीतेची मर्यादशीलता आणि गोस्वामीजींचें कलाचातुर्य प्रेक्षणीय आहे. पुढे हिंदी मूळ व श्रीखंड्यांचा सरसरमणीय मराठी अनुवाद देत आहें :

"कोटिमनोज लजावनि हारे । सुमुखि ! कहहु को आहि तुम्हारे ?"
मुनि सनेहमय मंजुल बानी । सकुची सिय मनमहुँ मुसकानी
तिन्हहि बिलोकि बिलोकति धरनी । दुहुँ सकोच सकुचति बरबरनी
सकुचि सप्रेम बाल मृगनयनी । बोली मधुर बचन पिकबयनी;
"सहज सुभाय सुभग तन गोरे । नामु लखनु लघु देवर मोरे"
बहुरि बदनु बिधु अंचल ढाँकी । पिय तन चितइ भौंह करि बाँकी.

"कीं कामकोटिसहि लाजविणार हेचि ! । आहेत कोण तव हे वद गे ! अम्हांला ?"
ती प्रीतिमंजुल वचें परिसोनि सीता । संकोचुनी मनिं, करि स्मित तुष्टचित्ता;
"ते गौरकांती मधुर स्वभावतां । हो धाकटे देवर लक्ष्मण स्वतां ।"
वस्त्रांचलें आननचंद्र झांकुनी । प्रियाकडे पाहत वक्रलोचनीं;

श्रीखंड्यांचा अनुवाद ओळीस ओळ आणि शब्दास शब्द असा नाही. क्वचित् त्यांत कमीजास्त प्रकार झाला आहे. क्वचित् मुळांतला अर्थ अनुवादांत उतरलेला नाही. उदाहरणार्थ, भरत चित्रकूटावर रामाच्या भेटीस जातो. त्या प्रसंगीं मुळांत एक प्रश्नात्मक अर्थांतरन्यास आहे;—'जग बौराइ राजपद पाएँ.' म्हणजे 'राज्यपद प्राप्त झालें की जग देखील बावचळतें.' श्रीखंड्यांनी 'येतांच राज्यपद ये मद, ना कुणास ?' असा याचा अनुवाद केला आहे. त्यांत मुळांतील 'जग' या शब्दाचा जोर व 'बौराइ' याचा अर्थ आलेला नाही. 'मद येणें' आणि 'बावचळणें' यांत अंतर आहे. तरीसुद्धा श्रीखंड्यांचा अनुवाद बहुतेक मुळास अनुसरून आहे. या म्हणण्याची साक्ष पुढील दोह्याचा अनुवाद देईल :

'मोसम दीन न, दीनहित तुम्ह समान रघुबीर
अस बिचारि रघुबंसमनि हरहु बिषम भवभीर.'

'न दीन माझ्यासम रामराया ! । तुम्हां असा दीनदयाळही न
रघूत्तमा ! जाणुनि हें हरावी । संसारिंची दारुण भीति पूर्ण !'

अनुक्रमणिका

लतेवरून खुडलेलीं फुलें पुष्पपात्रांत ठेविलीं म्हणजे त्यांची स्वाभाविक सुषमा किंचित् जाते, तसेंच अनुवादाचें आहे ! तुलसीदासजींच्या 'मानसा'ची माधुरी मोरोपंत म्हणतात त्याप्रमाणे 'हें जों जों सेवावें तों तों सेव्याचि गमे सुधारसें' अशी आहे. ती हिंदी साहित्यांतली सुधा श्रीलंड्योंनी मराठीच्या कलशांत ओतली आहे. तिचा भाविकांनी व रसिकांनी अवश्य आस्वाद घ्यावा. ● ●

भ. श्री. पंडित

## भारतीय दर्शन-संग्रह

महाराष्ट्रीय संतसाहित्याच्या अभ्यासासाठी दर्शनांच्या ज्ञानाची अत्यंत आवश्यकता आहे. आजपर्यंत मराठींत दर्शनांची माहिती देणारा एकाहि ग्रंथ नव्हता. आता या ग्रंथाच्या प्रकाशनाने ती त्रुटि दूर झाली आहे.

वेदकालीं व ब्राह्मणकालीं यज्ञसंस्थेचें स्तोम फार होतें. पुढे उपनिषत्कालीं विचारक्रांति झाली, आणि भिन्नभिन्न विचारधारा उत्पन्न झाल्या. यांतील कांही वैदिक तर कांही अवैदिक; कांही वेदान्तोपयुक्त; कांही कर्ममार्गी, कांही ज्ञानमार्गी, आणि कांही विष्णूपासक किंवा शिवोपासक भक्तिमार्गी होत्या. त्याच पुढे दर्शनांच्या रूपाने स्थिरावल्या आहेत. त्यांपैकी अनेक दर्शनांचें दर्शन पं. जोग यांनी प्रस्तुत ग्रंथांत आपल्या सरल, सुबोध आणि सरस शैलीने घडविलें आहे.

आरंभीं दर्शनकाराचें जीवनवृत्त, मग त्याचा सिद्धान्त, नंतर त्या सिद्धान्ताचें विवरण व शेवटीं स्वतः पं. जोग यांनी केलेलें त्याचें मंडन किंवा खंडन—असें सामान्यतः या ग्रंथांतील विवेचनाचें स्वरूप आहे. विषय कठीण असूनहि पंडितजींनी तो सुगम केला आहे. पंडितजींचे विचार स्पष्ट आहेत; तर्कपद्धति सुसंगत, विशुद्ध व विशद आहे. भाषा पारिभाषिक संज्ञांनी युक्त असूनहि प्रवाही आहे, अभिव्यक्ति अमोघ आहे आणि लेखनांत अनुपम लालित्य आहे. त्यामुळे हा ग्रंथ जसा संग्रहणीय तसाच वाचनीय झाला आहे. पंडितजींच्या विवेचनांत आरंभापासून अंतापर्यंत एकसूत्रीपणा आहे. याला कारण त्यांनी प्रत्येक दर्शनाचा विचार अगोदर स्वतंत्र रीतीने करून नंतर तो श्रीशंकराचार्यांच्या अद्वैताच्या कसोटीवर घासून, पुसून व तपासून पारखला आहे; आणि इंग्रजींत 'in the light of the SANKAR-VEDANTA' असा खुलासाहि केला आहे. परंतु या संग्रहांत सर्वच दार्शनिकांच्या दर्शनांचा विचार झालेला नाही. यांत रामानुज, शंकर, मध्व व वल्लभ यांचीं दर्शनें आहेत; पण निंबार्क, विष्णुस्वामी, रामानंद व चैतन्य यांचीं दर्शनें दृष्टीस पडत नाहीत. कदाचित् 'उपसंहारां'त पृ. ६७८ वर पंडितजी सांगतात त्याप्रमाणे 'कै. बापटशास्त्री यांच्या ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाले'त तीं दर्शनें प्रसिद्ध झालीं असावींत.

पंडितजींनी दर्शनांचें जें वर्गीकरण केलें आहे त्या बाबतींत मतभेद होऊं शकतो. महानुभाव हे भागवतधर्मीयांप्रमाणेच दत्तोपासक व कृष्णोपासक आहेत. मग त्यांचा अंतर्भाव अवैदिकांत का करावयाचा ? किंवा महानुभाव हा एक पंथ आहे व नाथ हा एक संप्रदाय

**भारतीय-दर्शन-संग्रह**—[ ग्रंथकार अद्वैतवेदान्तालंकार आचार्यभक्त पं. **द. बा. जोग**, उपनिषत्तीर्थ; एकमेव विक्रेते–चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; पृ. ७८०, मूल्य रु. १५. ]

आहे; त्यांचे आचारधर्म कांहीसे लोकविलक्षण असतील, पण म्हणून त्यांचीं दर्शनें स्वतंत्र व निराळीं आहेत का? 'आचारधर्म' आणि 'दर्शन' यांत अंतर नाही का? आणि जर या पंथाला व संप्रदायाला दर्शनसंग्रहांत स्थान द्यावयाचें तर मग तें इतर पंथांना व संप्रदायांना कां नको? जर या दर्शनांचा, मतांचा व पंथांचा विचार ऐतिहासिकदृष्ट्या कालानुक्रमाने झाला, तर विशिष्ट पंथ हा विशिष्ट कालीं व विशिष्ट स्थळीं कां उत्पन्न झाला, व त्याने जुनें कोणतें ठेवलें आणि नवें कोणतें घेतलें, व जुनें जें टाकलें तें कां टाकलें यांवर प्रकाश पडेल. या ऐतिहासिक दृष्टिकोनांतून आजच्या ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज, थिऑसॉफी या पंथांचाहि विचार करतां येईल. कबीर आणि नानक यांच्या मतांचा आणि सिख्खांच्या पंथाचाहि विचार या दृष्टीने केल्यास मार्गदर्शक ठरेल.

या विवेचनपर ग्रंथांत पंडितजी संशोधनाच्या आडरानांत शिरले नाहींत हें एकापरीने बरेंच झालें. कारण हा ग्रंथ कांही संशोधनात्मक नाही. परंतु क्वचित् विवाद्य प्रश्न उपस्थित होतात तेथे खुलाशाची आवश्यकता भासते. पृ. ५५५ वर वल्लभांच्या संदर्भांत पंडितजी विष्णुस्वामी व बिल्वमंगल यांचा उल्लेख करतात. या विष्णुस्वामींचा उल्लेख माहींभट्टाच्या 'लीलाचरित्रां'त आहे. त्याचप्रमाणे नाभाजीने आपल्या 'भक्तमाल'मध्ये 'विष्णुस्वामि संप्रदायि श्रीज्ञानदेव गंभीरमति' असा ज्ञानेश्वरांचा उल्लेख केला आहे. स्वतः ज्ञानेश्वर आपण नाथपरंपरेंतले आहोंत म्हणून सांगतात. पण वारकरी त्यांना आपल्या पंथाचे अध्वर्यु मानतात. मागे 'श्रीसरस्वतीमंदिर' या मासिकांत इतिहासाचार्य राजवाडे यांनी 'भक्तमाल'वर एक संशोधनपर ग्रंथ लिहिला होता. त्यांत 'बिल्वमंगल' म्हणजेच 'पुंडलीक' असें विधान ते करतात; आणि पुंडलिकाकरिताच तर 'सांवळें परब्रह्म अठ्ठावीस युगें पंढरपूरच्या विटेवर उभें आहे!' पृ. ५५३ वर पंडितजी वल्लभाचार्यांच्या पंढरपूरच्या भेटीचा आणि याच ठिकाणीं 'श्रीविठ्ठलां'नी त्यांना लग्न करण्याची आज्ञा दिल्याचा उल्लेख करतात. वल्लभाचार्यांच्या चिरंजीवांचें नांवहि 'विठ्ठलनाथ' होतें. तेव्हा वारकरी संप्रदायाच्या दृष्टीने या सर्व विवाद्य प्रश्नांचा विचार होणें आवश्यक आहे.

पंडितजींना महाराष्ट्रीय संतांबद्दल नितान्त भक्तिभाव आहे. 'उपसंहारां'त त्यांनी त्या प्रातःस्मरणीयांचा चिरस्मरणीय व रमणीय निर्देश केला आहेः—

'ज्ञानमूर्तिं ज्ञानदेवं, साक्षात्प्रेमस्वरूपिणम् —<br>
नामदेवं, दयामूर्तिं नाथं वंदे पुनः पुनः,<br>
वैराग्यस्य परां मूर्तिं देहूक्षेत्रनिवासिनम् —<br>
तुकारामं, महाराष्ट्र-भक्तराजचतुष्टयम्'

या भक्तराजांच्या 'वाणी'चें मंथन करून त्यांतील 'भक्तिदर्शना'चें नवनीत पंडितजींनी 'महाराष्ट्रा'स चाखवावें अशी त्यांना सविनय विनंती आहे. ● ●

म. श्री. पंडित

## नाट्य-संगीत

महाराष्ट्राच्या बौद्धिक व कलात्मक जीवनाचा विचार करतांना त्या त्या क्षेत्रांतील वादांचा इतिहास डावलून चालणार नाही; किंबहुना त्या वादांच्या इतिहासावरूनच त्या त्या

**नाट्य-संगीत** —[ लेखक : **श्री. ह. रा. महाजनी**; प्रकाशक : **पु. वि. गाडगीळ**, मकरंद साहित्य, वडाळा, मुंबई ३१; मूल्य ३ रु. ]

जीवनाचें स्वरूप स्पष्ट होत असतें. अशाच एका वादग्रस्त विषयाचें प्रतिपादन श्री. ह. रा. महाजनी यांनी आपल्या ' नाट्य-संगीत ' या पुस्तकांत केलें आहे.

नाट्य-संगीत या विषयावर व्याख्यान देण्याच्या कल्पनेंतून त्यांच्या प्रस्तुत प्रबंधाचा जन्म झालेला असला तरी आज नाट्य-संगीताची व पर्यायाने नाट्य-कलेची होत असलेली विटंबना थांबवावी व नाट्य-संगीत हें जें मराठी रंगभूमीचें कलात्मक वैशिष्ट्य आहे त्याचें पुनरुज्जीवन जाणीवपूर्वक करण्याचे प्रयत्न करावे हाहि हेतु ग्रंथलेखनाच्या मुळाशीं आहे. हा हेतु साध्य होण्याच्या दृष्टीने नाट्य-संगीताचा विकास कोणत्या दिशेने झाला व व्हावा याचें सुललित, सुबोध व साधार विवेचन महाजनी यांनी प्रस्तुत ग्रंथांत केलेलें आहे.

संस्कृत गद्यपद्यात्मक नाटकांतून अण्णासाहेब किर्लोस्करांनी मराठी रंगभूमीवर गायन-कलेचा एक नवा पैलू पाडला व अभिजात संगीताच्या प्रकृतीला अपाय न करतां नाट्याला अनुकूल अशी संगीताची मांडणी केली. स्वर व लय यांचें भावनाविष्कार करण्याचें सामर्थ्य त्यांनी ओळखलें होतें म्हणूनच त्यांना तशी मांडणी करतां आली. या विवेचनाच्या संदर्भात संगीताने नाट्यरसाची हानि होते हें मत कसें चुकीचें आहे हें सिद्ध करण्याशाठी महाजनींनी काव्यांतील रसपरिपोषासाठी गेयता कशा स्वरूपाची व किती प्रमाणांत असावी याची चर्चा केली आहे. ती करतांना ग्रंथकाराने ' छन्दोरचने 'पासून ' रसविमर्श 'पर्यंत व गाथासप्तशतीपासून देवल-बोडसांच्या आठवणीपर्यंतचे पोषक पुरावे परिश्रमपूर्वक सादर केले आहेत. या संगीताचे ख्याली संगीत, नाट्य-संगीत व अलीकडचें सुगम संगीत असे स्थूलमानाने तीन वर्ग पाडून नाट्य-संगीत इतर दोन प्रकारांचा सुवर्णमध्य साधतें व म्हणूनच नाट्याला उठाव देतें हें त्यांनी स्पष्ट केलें आहे.

नाट्यसंगीताच्या अवताराची कुळकथा सांगतांना लावणी व नारदीय कीर्तन या कलाप्रकारांचा नाट्यसंगीतावर कसा परिणाम झाला आहे हें लालित्यपूर्ण भाषा-शैलीने महाजनींनी सांगितलें आहे. लावणी व कीर्तन या कलाप्रकारांच्या स्वरूपाचें त्यांनी जें सूक्ष्म विश्लेषण व काव्यात्म वर्णन केलें आहे त्यावरून त्यांच्या चिकित्सक पण रसिक वृत्तीची साक्ष पटल्याशिवाय राहत नाही. नाट्य-संगीताच्या पूर्वतयारीची अशी स्पष्ट व साधार कल्पना वाचकांना करून देणाऱ्या लेखकाला संगीताचें मार्मिक ज्ञान असावें लागतें हेंहि ओघानेच आलें.

नाट्य-संगीताचें रसग्रहण करतांना लेखकाने किर्लोस्कर—देवलांच्या सुरवातीच्या नाटकांतील संगीताच्या अनुरोधाने नाट्यसंगीत हें कथानकाच्या प्रवाहाशीं एकरूप झालेलें प्रवाही संगीत आहे असा निष्कर्ष काढला आहे. त्याचप्रमाणे गेल्या पन्नास वर्षांतील नाट्य-संगीतामध्ये जीं स्थित्यंतरें घडून आलीं त्याच्या स्थूलमानाने (१) किर्लोस्कर व देवल यांच्या नाटकांतील संगीत, (२) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व वीर वामनराव जोशी यांच्या नाटकांतील संगीत व (३) खाडिलकरांच्या एकपात्री संगीत जलशांतील संगीत, अशा तीन उतरंतीला लागलेल्या अवस्था त्यांनी मानल्या आहेत. केवळ गद्यपद्याचा बेमालूम सांधा साधण्यासाठी अगर कथानकाचा ओघ अखंडित राखण्यासाठीच नाट्यसंगीताचा जन्म झालेला नाही, तर भावनाविष्कार व रसपरिपोष हें या संगीताचें मुख्य कार्य आहे हेंहि त्यांनी सोदाहरण प्रतिपादन केलें आहे.

नाट्यसंगीताची परंपरा, घटना व रचना यांचा हा इतिहास महाजनींनी सुसंगत, तर्कशुद्ध व मनोरंजक रीतीने आपल्या पुस्तकांत दिला आहे. मात्र भूतकाळांत जें घडलें त्याचे आराखडे अगर आलेख भविष्यकाळांतहि खरे होतील व नाट्य-संगीत पूर्वीपेक्षा अधिक

वैभवाने तळपेल हा जो त्यांचा आत्मविश्वास अगर त्यांच्या प्रबंधाचा प्रमुख निष्कर्ष व पुस्तक लिहिण्याच्या मागचा प्रधान हेतु आहे तो कितपत साध्य होईल याबद्दल शंका वाटते. अर्थात्, अमरपदास पोचलेल्या जुन्या नाटकांच्या कालमानाला धरून सुटसुटीत रंगावृत्त्या काढण्याची त्यांची सूचना स्वागतार्ह आहे. पण किर्लोस्कर-देवलांच्या वेळच्या प्रेक्षकांच्या अभिरुचींत व आवडी-निवडींत कालान्तराने आज फरक पडलेला आहे व रंगमंचावर गाणें ऐकतांना कांही गोष्टी गृहीत धरून चालणारा त्या वेळचा प्रेक्षक व श्रोता आज तसें करावयास तयार होईलच असें नाही. ज्या अद्ययावत् पुस्तकाच्या पार्सलांचा महाजनींनी आपल्या पुस्तकांत अधिक्षेपाने उल्लेख केला आहे त्यांतील पुस्तकांच्या वाचनामुळे असो अगर भोवतालच्या प्रगत विचारसरणीच्या प्रभावामुळे असो, सुसंस्कृत व सुशिक्षित अतएव प्रगत झालेल्या प्रेक्षकांच्या अभिरुचींत कालमानाने बदल व्हावा हें साहजिकच होय. सूचकता, विस्तारसंक्षेप व कलात्मकता हे आजच्या नाटकाचे विशेष होऊन बसले आहेत. आजच्या नाटकांतील संगीत हें आजच्या तंत्राशीं समरस झालेलें असलें पाहिजे तरच तें रोचक होईल. आजचें जीवन जसें संमिश्र ( Complex ) आहे तसेंच त्या जीवनांतील नाट्यहि संमिश्र स्वरूपाचें आहे. देवलांच्या शारदेंतील पात्रांच्या जीवनासारखें सरळ नि धोपटमार्गी तें नाही. अशा परिस्थितींत नाट्यसंगीताचें पदें, चाली व संगीत या दृष्टीने पुनरुज्जीवन करण्याची भाषा म्हणजे एकप्रकारें शिळ्या कढीला ऊत आणण्याचीच भाषा होय. विलायतेहून पार्सलांनी आलेल्या नाटकांची सहीन्सही नक्कल करून जसें नवें नाट्य निर्माण होणार नाही, त्याचप्रमाणे पुनरुज्जीवनासाठी आसुसलेल्या रंगभूमीने भावी नाटककारांना आदेश देण्यानेहि नाट्यसंगीत प्रभावी होणार नाही. नारदीय कीर्तनाची गोडी ज्यांना अजून वाटते त्यांना किर्लोस्कर-देवलांचीं नाटकें रोचक वाटतील हें मान्य; पण अशा कीर्तनांत रस घेणारे श्रोते उत्तरोत्तर विरल होत आहेत. यशवंत-गिरीशांच्या काव्यगायनाला लोलुप असलेले त्या वेळचे श्रोते व तशा प्रकारच्या काव्यगायनाचा सर्वस्वीं अधिक्षेप करणारे आजच्या काव्याचे श्रोते यांतसुद्धा कालान्तराने फरक पडलेला आज दिसून येतो. या वस्तुस्थितीची दखल महाजनींनी न घेतल्यामुळेच नाट्यसंगीत पूर्वीपेक्षाहि अधिक वैभवाने तळपेल ही त्यांची आशा भाबडीच समजली पाहिजे. मात्र नाट्यसंगीताची घटना, रचना, परंपरा यांचा अधिकारवाणीने लिहिलेला इतिहास म्हणून महाजनींच्या पुस्तकाला निःसंशय महत्त्व आहे. ● ●

वा. रा. ढवळे

## नभ अंकुरलें

आता ज्या दुसऱ्या पुस्तकाचें मी येथे दर्शन घडविणार आहे तें पुस्तक म्हणजे कवि तुळशीराम काजे यांचा 'नभ अंकुरलें' हा कवितासंग्रह होय. या संग्रहांत कवीच्या १९५३ ते १९५८ दरम्यानच्या ४१ निवडक प्रकाशित-अप्रकाशित कवितांचें संकलन करण्यांत आलें आहे. कवीचा हा पहिलाच संग्रह आहे व काव्यलेखनहि गेल्या पांच-सहा वर्षांतीलच आहे याची जाणीव कविता वाचतांना होते. आजकालच्या आघाडीवरील कवींच्या

नभ अंकुरलें —[ कवि : श्री. तुळशीराम काजे, धारा प्रकाशन, अमरावती, मूल्य २ रु. ]

कवितांचें अनुकरण करण्याची वृत्ति व स्वतंत्र अभिव्यक्ति करण्याची धडपड या सीमारेषेवर काजे यांची कविता आज घोटाळत असल्याचे पुरावे या संग्रहांत मधून मधून आढळतात. एक काळ असा होता की, कवीचें काव्यलेखन संपुष्टांत आलें तरी कवीच्या काव्याचा संग्रह प्रसिद्ध होणें कठीण गोष्ट होती. पण आज कवि काव्यलेखनाला सुरवात करतो न करतो तोंच त्याच्या काव्याचे संग्रह प्रसिद्ध होऊं लागतात. याचा एक फायदा असा होतो कीं, आशय व अभिव्यक्ति यांच्या बाबतींत आपली कितपत प्रगति होत आहे हें खुद्द कवीला कळण्यास जशी मदत होते, त्याचप्रमाणे रसिकालाहि त्या त्या कवीची व पर्यायाने एकंदर काव्याची वाटचाल कळण्याचें साधन मिळूं शकतें.

प्रस्तुत संग्रहांतील ४१ कवितांचा साकल्याने जर विचार केला तर कविमनाला जीवनाचा प्रखर उन्हाळा अगर जीवनांतील तीव्र दुःखें हीं विशेष जाणवलेलीं दिसतात. कारण त्यांचें पोळलेलें वऱ्हाडी कविमन सुकलेले वृक्ष, टाहो फोडणारा मयूर, चोच वासून निपचित पडलेली जमीन, जळकटलेला डोंगरमाथा, गारठलेल्या जुन्या बातम्या यांच्या व्यापक जीवनाशीं साधर्म्य शोधूं लागतें, व जीवनांत गारवा मिळावा म्हणून त्यांच्या नजरेने मृगांतील आकाशाकडे मोठ्या आशेने पाहूं लागतें. त्यांचें कविमन

पसरली मृगछाया, मनीं उल्हास वाटला,
मोहरेल आज उद्यां, इथे पाऊस पहिला
धरतीच्या अंतरीची, आग विझेल क्षणांत
पेंगतील दाही दिशा, गारव्याच्या झोंपाळ्यांत
उदासीन सरितेच्या, संचरेल हृदीं प्रीत
डोंगराच्या शुष्क ओठीं शहारेल भावगीत

अशीं गोड व आशावादी स्वप्नें रंगविण्यांत उल्हास पावतें. कवीची हीच वृत्ति नभ अंकुरलें, सांज, मोहरेल आज उद्यां, इथें केधवां, ढगाळलेलें आसमंत या कवितांत मोठ्या उत्कटतेने प्रकट झालेली आहे. विशेषतः इथें केधवां व ढगाळलेलें आसमंत या कवितांत जलबिंदूंच्या आगमनाची अधीर व उत्कट आशेने वाट पाहण्यांत त्यांच्या कविमनाचें झालेलें दर्शन म्हणजे श्री. काजे यांच्या प्रतिभाशक्तीचा रम्य विलासच होय. त्या दृष्टीने

धुरकटलेला डोंगरमाथा – रखरखलेली दुपार पिवळी
भरभरणारें मृगजळ भंवती – नांगरलेली जमीन काळी
तीव्र उन्हाचा मार खाउनी – पेंगुळलेला घामट वारा
भिरभिरणारा इकडे तिकडे – हरिणांचा तो कळप बिचारा
उमटायाचें इथे केधवां – जलबिन्दूंचें सुस्वर गाणें
वाट पाहती तहानलेले – बियांत अंकुर केविलवाणे.

या ओळीं उद्धृत करण्याचा मोह आवरत नाही.

जीवनांत जाणवलेल्या उन्हाळ्यामुळे असो अगर अनुभविलेल्या निराशेमुळे असो, कवीची वृत्ति उदास, उपरोधिक, बंडखोर, निरीश्वरवादी अगर श्रद्धाहीन झालेली आढळून येते. या वृत्तीचा त्यांच्या काव्यांत झालेला आविष्कार कवीच्या कल्पनासामर्थ्याचा, शब्दसौष्ठवाचा, अर्थगौरवाचा, इतकेंच नव्हे तर, जिवंत अनुभवाशीं राखलेल्या त्यांच्या प्रामाणिकपणाचा पुरावा होय. अल्पकाळांतहि कवीने स्वानुभवाच्या अभिव्यक्तींत उल्लेखनीय यश मिळविलें आहे. मात्र आजच्या कवितेचा बनत चाललेला साचा, त्या कवितेचे संकेत यांच्या आवर्तांतून कवि बाहेर आला व अभिव्यक्तीच्या नखरेलपणापेक्षा आशयाच्या भव्यतेचीं उदात्त स्वप्नें पाहूं लागला

तरच त्याला उज्ज्वल भविष्यकाळ आहे. नाहीतर स्वतःच्याच कल्पनांचें व विचारांचें आवर्तन करून, कवितेच्या गुणापेक्षा कवितेचें संख्याबल वाढण्याचाच अधिक संभव. ● ●

वा. रा. ढवळे

## तुकाराम महाराज यांचे संतसांगाती

आपल्याकडील काय किंवा इतर प्रांतांतील काय, सर्वच संतांचीं चरित्रें बहुधा आख्यायिका आणि चमत्कार यांनी सजवलेलीं असतात. अशीं ' लीलामृतें ' भाविकांना ठीक आहेत; पण बुद्धिवादी, चिकित्सक दृष्टीच्या माणसांना तीं व्यासंगी अभ्यासाला निरुपयोगी वाटतात. महाराष्ट्रीय संतांचीं चरित्रें कथापुराणांतून रसाळ परिणामकारक पद्धतीने हरदासांना सांगावयाचीं असल्याने त्यांनी त्यांत बराच मसाला भरून संतमहिमेला चांगला उठाव दिला; ईश्वरावतार, दैवी गुण दाखविण्यासाठी लीलांची ठराविक प्रभावळ संतांच्या भोंवती मांडावयाची हातोटी त्यांस साधून गेली होती. शिवाय मठाधिपति, शिष्य आणि सांप्रदायिक यांना स्वतःच्या चरितार्थासाठी गादीची प्रतिष्ठा जेणेकरून वाढेल त्या खऱ्याखोट्या ( बहुतांशीं खोट्याच ) गोष्टी संतांच्या नांवावर दडपून देण्याची कारवाईहि कांही कमी नव्हती. अशा भोळ्याभाबड्या, अनैतिहासिक, अंधारी वातावरणांत, श्री. वेंद्रे यांच्यासारख्या एखाद्या डोळस, श्रद्धाळू पण ऐतिहासिक सत्याचीच कास धरणाऱ्या चरित्रलेखकास भूस पाखडून कणांचें टिपण करण्यास किती परिश्रम—कायिक, आर्थिक आणि बौद्धिक—करावे लागत असतील याची कल्पना येणें कठीण.

श्री. वासुदेवराव वेंद्रे हे एखाद्या विद्यापीठांतून बाहेर पडलेले पदवीधर किंवा प्राध्यापक नव्हेत की ज्यांना पद्धतशीर व चिकित्सक अभ्यासाची माहिती आपोआप झालेली आहे. शिक्षणखात्यांत साध्या कारकुनापासून सुपरिंटेंडेंटच्या हुद्द्यापर्यंत चढून शेवटीं राजदप्तरदार जे झाले ते अव्याहत निरलस व लक्षपूर्वक केलेल्या. कामामुळे याच कार्यव्याप्तींत फावल्या वेळचा त्यांचा संशोधनपर व्यासंग दांडगा असे. ' साधन-चिकित्सा ' हा त्यांचा तीस वर्षांपूर्वीं शिवशाहीच्या इतिहाससाधनांची चर्चा करणारा ग्रंथ आजहि एकमेव महत्त्वाचा म्हणतां येईल. थोड्या अवधींत त्यांनी इंडिया ऑफिसांतील मराठेशाहीवरील कागदपत्रांची छाननी करून इकडे आणलेल्या नकला पुढच्या अभ्यासकांना मोठा ठेवा वाटेल यांत शंका नाही.

इतिहास-संशोधकाने वाङ्मयक्षेत्रांत जर आपली चिकित्सक दृष्टि फिरविली तर त्यांत कसे नवे नवे शोध लागतात व जुनीं परंपरागत आलेलीं मतें कशीं दुरुस्त होतात हें इतिहासाचार्य राजवाडे, म. म. पोतदार यांच्याप्रमाणेच श्री. वेंद्रे यांनी उत्तमप्रकारें दाखवून दिलें आहे. त्यांची ' मंत्रगीते'ची प्रस्तावना पाहिल्यास तुकारामाच्यासंबंधी किती तरी नवी विचारक्रांतिकारक माहिती उपलब्ध होते व तुकारामानेहि इतर कांही थोर संतकवींप्रमाणे श्रीमद्भगवद्गीतेचा सुबोध अभंगात्मक अनुवाद केला होता ही अपूर्व गोष्ट मनावर ठसते.

आतापर्यंत तुकारामाच्या अभंगगाथेचें प्रकाशन अनेकांनी केलेलें आहे व तींतील कांही प्रक्षिप्त भागहि दाखवून दिला आहे; पण श्री. वेंद्रे यांनी अनेक ठिकाणीं विखुरलेल्या अभंगांचीच

**तुकाराम महाराज यांचे संतसांगाती**—[ लेखक : वा. सी. वेंद्रे; प्रकाशक : मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, मुंबई ४. किं. ७॥ रु. ]

नव्हे तर त्यांतील प्रत्येक चरणाची छाननी करून त्याचें मूळ काय असावें याचा छडा लावला आहे. संहिताचिकित्सा ( textual criticism ) या आधुनिक सशास्त्र अभ्यासाचा जो भाषा-प्राध्यापक ' बाऊ ' करून दाखवितात तो अभ्यास श्री. बेंद्रे यांनी स्वतःच्याच पद्धतीने कसा सुगम करून ठेवला आहे हें त्यांच्याकडे समक्ष जाऊन पाहण्यासारखें आहे. आतांपर्यंत कितीतरी तुकाराम–अभ्यास-मंडळें निघून जें कार्य होऊं शकलें नाही तें त्यांनी एकट्याने गेल्या दहा वर्षांच्या परिश्रमाने सर्वांगांनीं पुरें करीत आणलें आहे व प्रस्तुत पुस्तक हें त्यांतील फलनिष्पत्तीचा एक नमुना म्हणतां येईल.

"'तुकारामदर्शन करून घेण्यापूर्वी किंवा त्यांचें चरित्र लिहिण्यापूर्वी त्यांच्या मंदिरा-भोवतालील आवार साफ करण्याचें काम प्रथम करणें प्राप्त झालें आहे." हा उद्देश मनांत धरून, त्यांनी "मिळाले तितक्या पुराव्यांनी शक्य तितकी तुकोबांच्या आवाराची झाडझूड व साफसफाई केली आहे. " रामेश्वरभट, मंबाजी गोसावी, शेख महंमद, बहिणाबाई, चिंचवडकर देव, अनघडशा, गवाशेट, संताजी जगनाडे, कोंडभट, कचेश्वर ब्रह्मे, संताजी पवार, निळोबा, लोहगांवकर मंडळी व तुकोबांच्या चरित्राशीं संबंध जोडलेल्या व्यक्ति, हे तुकाराम महाराजांचे समजले जाणारे सांगाती यांचा उपलब्ध ऐतिहासिक साधनांनी, तसेंच तत्कालीन सामाजिक परिस्थितीची घडण नीट लक्षांत घेऊन, या ग्रंथांत समतोल परामर्श घेतला आहे.

तुकाराम कथा–नाटकांत खलपात्रांत रामेश्वरभट व मंबाजी हे यावयाचेच; व छळक जितका निष्ठुर, तितका जास्त उठाव नायकाला मिळतो या न्यायाने यांचीं दुष्कृत्यें भडक दाखविलीं गेलीं आहेत. पण श्री. बेंद्रे यांनी ऐतिहासिक सत्य पुराव्यानिशी असें दाखवून दिलें आहे की, वाघोलीचे योगमार्गी व कवि रामेश्वरभट हे तुकोबांचे परमार्थमार्गातील वृद्ध स्नेही होते; व ज्या अनघडशाने आपल्या पुण्याच्या विहिरीवर स्नान केलें म्हणून रामेश्वरभटास शाप दिला व जो तुकारामाची परीक्षा घेण्यास देहूस गेला तो फकीर या कालापूर्वीच कबरस्थ झालेला आहे. त्याचप्रमाणे लिंगाईत वाणी गवाशेट याची तुकोबाशीं दृढमैत्री व मरणसमयीं तुकोबाने दिलेलें दर्शन व या वाण्याचें विमानांतून स्वर्गारोहण, या साऱ्या भाकडकथा आहेत असें ते सिद्ध करतात. पण ते बहिणाबाईला तुकोबांच्या चरित्राची खरी साक्षीदार मानून तिच्या कवितासंग्रहांतून कांही गोष्टी सत्य म्हणून उजेडांत आणतात. यांपैकी एक म्हणजे तुकोबांच्या अभंगांच्या " वह्या तेरा दिवस उदकांत होत्या त्या ईश्वरानें वांचविल्या हा सत्य इतिहास आहे. या वह्या म्हणजे गीतेचा अभंगात्मक अनुवाद ( 'मंत्रगीता' ) " असें त्यांनी अनुमानलें आहे. बुद्धिवादी विवेचक अभ्यासकाला हें सहज पटण्यासारखें नाही खास. बहिणाबाई ही रामदासी पंथाची नव्हती व तुकोबांचा उल्लेख ' तुकाराम ' म्हणून तिनेच केला आहे; रामदासांनी तुकोबांचें 'तुकाराम' हें नांव ठेवलें ही काल्पनिक दंतकथा आहे. अशा प्रकारच्या कितीतरी नव्या गोष्टी श्री. बेंद्रे यांनी पुढे आणल्या आहेत. आणखी एक क्रांतिकारक शोध म्हणजे तुकोबांच्या अभंगांच्या जगनाडी वह्या. या वह्या म्हणजे तुकारामाच्या मूळ हस्तलिखित अभंगांची संताजी जगनाडे या समकालीन भक्ताने लिहिलेली अस्सल संहिता असा श्री. विनायकराव भावे यांनी मागे जो गाजावाजा केला होता त्या संशोधनाचा पायाच श्री. बेंद्रे यांनी उखडून टाकला आहे. या वह्या इ. स. १७२० नंतरचे अभंग-संग्रह आहेत असें त्यांनी मागेच एका स्वतंत्र लेखांत दाखवून दिलें आहे ( चित्रमयजगत्, जून १९५५ ).

तसेंच गंगाराम मवाळ हा तुकोबांचा लेखक नव्हता, एवढेच नव्हे तर, त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंधहि आला नसावा. आता वारकरी मंडळी कडूसला त्यांचा उत्सव करतात म्हणून संबंध मानणें अंधश्रद्धेचें ठरेल.

या ' संतसांगातीं 'त शेख महंमद या मुसल्मान संताची बरीच नवीन माहिती लेखकाने दिली आहे. विशेष म्हणजे जनार्दनपंताचे गुरु चांद बोधला व एकनाथशिष्य ' विवेकसिंधु '-कर्ता मुकुंदराज यांची अपूर्व माहिती वाचून चिकित्सक वाचक बुचकळ्यांत पडतील. मुकुंदराजाच्या कालाविषयी आज मोठा वाद आहे. तो ज्ञानेश्वरपूर्व कीं एकनाथोत्तर, याचा उलगडा निराभिमानाने अस्सल संशोधनात्मक साधनांनी झाला पाहिजे. तंजावर व धुळें येथील बाडांच्या परिशीलनाने श्री. बेंद्रे यांचा ग्रह असा झाला आहे की, विवेकसिंधुकार मुकुंदराज एकनाथाचा शिष्य होता.

याप्रमाणे अनेक नवीन मुद्दे श्री. बेंद्रे यांनी साधार पुढे मांडले आहेत. त्यांनी संतचरित्रांना मूळ आधार असलेलें साहित्य जसें अभ्यासिलें तसेंच तत्कालीन ऐतिहासिक प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध पुरावे जमा केले व शास्त्रशुद्ध आणि पूर्वग्रहांपासून अलिप्त अशा संशोधक दृष्टीने जें पाहिलें तें साधार विवेचिलें. हीं संतचरित्रें ज्या काळीं व ज्या समाजासाठीं लिहिलीं तो काळ आणि समाज लक्षांत घेतां तीं यथायोग्यच म्हणावीं लागतील. पण आज काळ निराळा आहे. तेव्हा सनातनी भाविक भाबडी दृष्टि तशीच ठेवल्यास या संतांना आपण अन्याय केल्यासारखें होईल. शिळें निर्माल्य तीर्थालयांत टाकून, ताजे खरे अलंकार व पुष्पहार अंगावर चढवून त्यांची खरी योग्यता टिकून राहील अशी साधना केली पाहिजे.

तुकोबांविषयी आदर तीनशे वर्षांच्या कालप्रवाहांतहि टिकून आहे, एवढेच नव्हे तर, तो सारखा वृद्धिंगत होत आहे. श्री. बेंद्रे हे त्यांचें त्रिखंडात्मक अधिकृत चरित्रभारत लिहिण्यास सुसज्ज झाले आहेत ही एकच गोष्ट त्यांचा या संतपरंपरेविषयी किती सादर जिव्हाळा आहे हें स्पष्ट करूं शकेल. मनांत हेवादावा बाळगून किंवा एखाद्या गोष्टीचा प्रचार करण्यासाठी त्यांनी हें संशोधन चालविलें नाही, याबद्दल दुमत होईल असें वाटत नाही. एकोणिसाव्या शतकापूर्वीचें आपलें बहुतेक मराठी वाङ्मय याप्रमाणेच चिकित्सेच्या भट्टींत टाकून, इतिहाससाधनाने सुलाखून घेणें अवश्य झालें आहे. या कार्यात श्री. बेंद्रे यांचें मार्गदर्शन आणि साहाय्य चांगलें उपयोगीं पडेल. ● ●

**चिं. ग. कर्वे**

## भक्तीचा कल्पवृक्ष

ईश्वरसाक्षात्कार हा अनुभवाचा विषय आहे. सर्व संतांनी हेंच सांगितलें आहे. ' अनुभव घ्या मग बोला ' असें साधुसंत म्हणतात. हा अनुभव मिळविण्यास श्रद्धा पाहिजे. येथे ' तर्कः अप्रतिष्ठः ' अशी स्थिति आहे. येथे श्रद्धेचेंच महत्त्व आहे. आजकाल लोकांची कशावरच श्रद्धा नसल्यामुळे सुकाणूं नसलेल्या होडीप्रमाणे त्यांची स्थिति झाली आहे. साक्षात्काराचा हा अनुभव मिळविण्यास ज्ञानमार्गाचा, योगमार्गाचा उपयोग नाही असें नाही; पण भक्तिमार्गाने हा अनुभव सुलभ तऱ्हेने मिळतो असें संतांचें सांगणें आहे. श्री. बहिरट यांनी स्वतः हा अनुभव घेतलेला आहे. भक्ति हें एक अगदी सुलभ साधन आहे. कल्पवृक्षा-

**भक्तीचा कल्पवृक्ष**—[ लेखक : श्री. भा. पं. बहिरट, एम्. ए., पंढरपूर. पंढरपूर संशोधन मंडळ; मुद्रक : कृ. ना. घळसासी, श्रीपांडुरंग मुद्रणालय, पंढरपूर. मूल्य ३ रुपये. ]

जवळ आपण जें मागूं तें मिळतें असें म्हणतात. पण हा भक्तीचा कल्पवृक्ष असा आहे कीं, याच्याजवळ भगवंताखेरीज दुसरें कांहींएक मागणें नको असें वाटतें. ईश्वराचें निरंतर स्मरण असावें एवढीच भावना दृढ होते.

भक्तीच्या कल्पवृक्षाच्या छायेंत बसल्यामुळे आज हे विचार सुचले आहेत. श्री. बहिरट यांनी आपल्या ग्रंथांत नऊ लेख भक्तिमार्गावर ( यांत एक लेख हिंदी आहे. ), दहा संतचरित्रपर व तीन तत्त्वविवेचनात्मक असे एकूण बावीस लेख लिहिलेले आहेत. जे भक्तिमार्गावर लेख आहेत, त्यांत त्यांनी भक्तीचें विवेचन केलें आहे. हा तात्त्विक भाग आहे. संतचरित्रपर जे लेख आहेत ते या तात्त्विक भागाचें प्रात्यक्षिक आहे असें म्हणतां येईल. भक्तिमार्गपर लेखांत त्यांनी भक्तीचें स्वरूप दाखविलें आहे. तसेंच भक्ति व इतर मार्ग यांचा त्यांनी ऊहापोह केला आहे. त्यांनी आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ ठिकठिकाणीं संतवचनें उद्‌धृत केलीं आहेत. हे सर्वच लेख वाचनीय आहेत. भक्तिमार्गासंबंधी जे गैरसमज लोकांत–सुशिक्षितांत सुद्धा–असतात ते या लेखांनी दूर होतील असें वाटतें. श्री. बहिरट यांच्या एवढ्या लेखांवरून सुद्धा परमार्थसंपत्तीचा केवढा वारसा आपल्याकडे आला आहे हें कळून येतें. श्रीतुकोबारायांच्या काळीं लोकांच्या समजुती जशा होत्या तशाच त्या आज आहेत हें ‘ बुडतां हे जन न देखवे डोळां ’ या लेखांत दिसून येतें. श्रीतुकोबांनी लोकांवर कठोर टीका करून त्यांना भक्तीस उद्युक्त केलें आहे. ईश्वरप्रेमाने जीवन पवित्र झालेलें असेल किंवा उदात्त विचारांनी मन भारलेलें असेल तर लेखकाची वाङ्मयनिर्मिति किती मोलाची होते हें श्री. बहिरट यांनी ‘ साहित्य व जीवन ’ या लेखांत दाखविलें आहे. लेखकांनी हा लेख मुळांतून वाचावा. वर प्रारंभीं लिहिल्याप्रमाणे संतचरित्रें हीं भक्तिमार्गाचीं प्रात्यक्षिकें आहेत. साधकांना निश्चितपणें हीं चरित्रें मार्गदर्शक होतील. ‘ प्रगति ’, ‘ धर्म आणि समाजव्यवस्था ’ व ‘ जडवाद ’ हे तात्त्विक स्वरूपाचे लेख आहेत. या लेखांत श्री. बहिरट यांची चिंतनशील मनःप्रवृत्ति दिसून येते.

श्री. बहिरट यांनी ‘ भक्तीचा कल्पवृक्ष ’ हें पुस्तक मराठी वाचकांपुढे ठेवून मराठी भाषेची जशी सेवा केली आहे, तशीच संतांची पण सेवा केली आहे. त्यांची लिहिण्याची शैली प्रसन्न व ओघवती आहे. ● ●

**गो. पु. पटवर्धन**

## पेशवाईतील रत्नें

ऐतिहासिक रूक्षतेला रोचक बनवून श्री.म.श्री. दीक्षित यांनी लिहिलेलीं हीं आठ ऐतिहासिक स्त्रीपुरुषांचीं छोटीं चरित्रें ‘ इतिहासाची आवड असलेल्या सर्वसामान्य ’ वाचकांना खात्रीने आवडतील. पेशव्यांच्या इतिहासांत ज्यांना आपल्या सत्कृत्याने वा दुष्कृत्याने, पौरुषाने वा फंदफितुरीने स्थान मिळालें अशा व्यक्तींच्या चरित्रांचा तर्जुमा या छोट्या पुस्तकांत दिला आहे. दुर्दैवाचे दशावतार पाहणारी गोपिकाबाई पेशवे, सद्‌गुण व दुर्गुण यांचा अर्क असलेला मानाजी फाकडा, घाशीराम कोतवाल व त्रिंबकजी डेंगळे, महाधूर्त व पाताळयंत्री एल्फिन्स्टन-

**पेशवाईतील रत्नें** — [ लेखक : **म. श्री. दीक्षित**, पुणें. प्रकाशक : **वा. शा. इनामदार**, इनामदार बंधु, ९९१ सदाशिव, पुणें २, पृष्ठसंख्या ७२; मूल्य एक रुपया. ]

साहेब, आंग्लभगत, राष्ट्रद्रोही बाळाजीपंत नातू, ' वचनाचे इनाम प्रमाण जाले ' त्या स्वामिनिष्ठ इब्राहिमखान गारदी व ' मराठ्यांचा काव्यमय इतिहासकार ' शाहीर प्रभाकर यांच्या व्यक्तिरेखा श्री. दीक्षित यांनी बहुतेक ठिकाणीं इतिहासाशीं इमानी राखून रंगविल्या आहेत. या लेखांचें स्वरूप प्रायः संकलनात्मक असलें तरी त्यांची ' जडणघडण ' मात्र कलादृष्टीची साक्ष पटविते. इतिहासाच्या ' कागदपत्रांच्या सूक्ष्म रानांत फेरफटका ' करतांना दीक्षितांनी अशींच फुलें वेचिलीं आहेत की, ज्यांनी या चरित्रमालेला शोभा यावी. ' शाहीर प्रभाकर ' या लेखांत त्यांची ही रसग्रहणात्मक दृष्टि स्पष्ट दिसून येते.

मात्र एक गोष्ट खटकते. ती ही की, श्री. दीक्षित यांनी चरित्रविषय केलेल्या व्यक्ति ' रत्न ' पदवीला कितपत पात्र ठरतात ? त्यांनी रेखाटलेल्या व्यक्तींपैकी बहुसंख्य व्यक्ति पेशवाईच्या उन्नतीऐवजीं अवनतीलाच कारणीभूत झाल्या आहेत. गोपिकाबाईचें सदाशिवराव भाऊंवर मारेकरी घालण्यांत अंग होतें, मानाजी फाकडा हैदरअलीला फितूर होऊन पेशव्यांवर उलटला होता. घाशीराम कोतवालाची जुलमी कारकीर्द पेशव्यांना मोठी अभिमानाची ठरली नाही, दरबारच्या कारभाऱ्यांविषयी त्रिंबकजी डेंगळ्याने बाजीरावाचे कान फुंकून त्याला अधोगतीकडेच खेचलें होतें. एल्फिन्स्टनसाहेब व बाळाजीपंत नातू हे तर उघड उघड पेशवाईचे शत्रु होते. तेव्हा ज्यांच्या कृत्यांनी दौलतीला उजळा मिळून तिची पत वाढली नाही त्यांना ' पेशवाईतील रत्नें ' संबोधणें म्हणजे शब्दांचा रूढार्थच बदलण्यासारखें आहे. रूढीने शब्दाला मिळालेलें अर्थवैभव वैयाकरणीहि नाकारूं शकत नाहीत. म्हणून लेखकाने ग्रंथाचें केलेलें ' नामकरण ' उचित वाटत नाही.

एवढें मात्र खरें की, श्री. दीक्षितांनी जर पेशवाईतील आणखी कांही रत्नें पुस्तकांच्या कोंदणांत बसवून वाचकांपुढे ठेवलीं तर त्यांचें वाचकांकडून उत्कंठेने स्वागत होण्याइतकी कमाई त्यांनी खासच केली आहे. ● ●

प्र. ल. गावडे

## सत्तावनचे सप्तर्षि

१८५७ सालीं सुरूं झालेल्या स्वातंत्र्ययुद्धाची परिसमाप्ति १९४७ मध्ये झाली, आणि मग स्वातंत्र्याच्या काळांत ५७ च्या इतिहासाला एक वेगळाच अर्थ प्राप्त झाला. पारतंत्र्याच्या काळांत हा इतिहास भारतीय अस्मितेने उजळला होता, भारतीय वीरांचें स्फूर्तिस्थान झाला होता. स्वातंत्र्यकालांत या इतिहासाचा उपयोग भारतीयांत एकात्मतेची, स्वातंत्र्याची भावना खोल रुजविण्याकरितां व नवराष्ट्ररचनेची प्रेरणा निर्माण करण्यासाठी केला जात आहे. भारत सरकारने याच दृष्टिकोनांतून गेल्या वर्षी स्वातंत्र्य-शमर-शताब्दी साजरी केली.

या शताब्दीच्या निमित्ताने ५७ च्या इतिहासाचें अनेक अभ्यासूंनीः पुन्हा आलोडन केलें व ' नाना मतांचा गिल्ला भयंकर ' माजला. या अभ्यासकांतहि कांही ' बंडवाले ' निघाले व ५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाला ' बंड ' संबोधून त्यांनी आपण ' वास्तव ' दृष्टिकोन मांडण्याचा प्रयत्न केला. उलट ५७ चें युद्ध हें भारतीय स्वातंत्र्ययुद्धच होतें असें ठामपणें प्रतिपादणारा

सत्तावनचे सप्तर्षि—[ लेखक : म. श्री. दीक्षित; प्रकाशक : इनामदार बंधु, पुणें २; पृष्ठसंख्या ८०, किंमत १। रुपया. ]

पक्षहि पुढे सरसावला. श्री. म. श्री. दीक्षित हे या दुसऱ्या पक्षाचे अनुयायी आहेत. ' सत्तावनचे सप्तर्षि ' या ग्रंथनामकरणांतूनच त्यांची अस्मिताधिष्ठित भारतीय परंपरागत दृष्टि दिसून येते; आणि संपूर्ण ग्रंथाची रचनाहि त्यांनी अशीच केली आहे की, या वेगवेगळ्या चारित्रांतून स्वातंत्र्याचें एक सूत्र गुंफलेलें दिसावें. श्री. दीक्षित यांनी इतिहासाच्या कागदपत्रांना राष्ट्रीय हेतूची सुंदर चौकट घातली आहे, लालित्याचे मनोहर रंग त्यांत भरले आहेत, पूर्वसूरींच्या वचनांचे मोहक हार त्यावर घातले आहेत, आणि भावभक्तीचे सुगंध येथें दरवळत ठेवले आहेत; पण श्री. दीक्षित यांची डोळस भक्तीहि मधून मधून दिसते. कानपूरला झालेल्या इंग्रज स्त्रीपुरुषांच्या दोन अमानुष कत्तलींचें समर्थन त्यांनी केलें नाहींच, उलट अजिमुल्ला व रंगो बापूजी यांच्या व्यक्तित्वावर या प्रसंगांतून शोधज्योत धरली आहे. पुस्तकांतील माहिती व शेवटीं दिलेला कालपट यांतून ग्रंथकर्त्याचा साक्षेप दिसून यावा. ● ● ●

प्र. ल. गावडे

## साभार-स्वीकार

१ अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक (च. खंड)—गं. दे. खानोलकर; स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, केळेवाडी, मुंबई ४; ४ रु.

२ राष्ट्रध्वज (नाटक)—ना. रा. बामणगावकर; ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; रु. १=५० न.पै.

३ आचार्य अत्रे : विविध दर्शन— ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १० रु.

४ वसुधा (काव्य)–अ. श्री. मवाळकर; सौ. प्रतिमा मवाळकर, १३ क्षत्रिय भुवन, गिरगांव-मुंबई ४; २॥ रु.

५ संशोधन मुक्तावलि (सर तिसरा)– वा. वि. मिराशी; विदर्भ संशोधन मंडळ ग्रंथमाला नागपूर १; ४ रु.

६ प्याद्याचा फर्जी-मालोजी (अथवा भोसले घराण्याचा अभ्युदय)—कै. ना. कृ. गद्रे; अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; २। रु.

७ धुवाधार (काव्य)—बाबुलनाथ; कांटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ३॥ रु.

८ व्यक्ति तितक्या प्रकृति (व्यक्तिचित्रें) —सुलभा पाणंदीकर; अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; ३ रु.

९ माधवस्वामीकृत यागवासिष्ठ (भाग १ ला) संपा.–शं. गो. तुळपुळे; रजिस्ट्रार पुणें विद्यापीठ, पुणें ७; ७ रु.

१० संकेत कोश—श्री. श्री. हणमंते; सौ. कमलाबाई बेंद्रे, गोगटे बंगला, मुरारजी पेठ, सोलापूर; ५ रु.

वा. रा. ढवळे

# कवि माधव केशव काटदरे

कवि माधव गेले! मराठींतील निर्भेळ ऐतिहासिक कवितेचे जनक इतिहासजमा झाले. कोकणांतील निसर्ग-सौन्दर्याचा कण नि कण टिपून घेणारा निसर्गाचा कवि निसर्गमय झाला! माधवराव कित्येक वर्षे रक्तदाबाच्या विकाराने आजारी होते, आणि केव्हा तरी असेच अनपेक्षितपणाने ते आपल्यांतून निघून जाणार हें भवितव्य ठरलेलें होतें. पण ज्या दिवशीं ते इहलोक सोडून गेले त्या दिवशीं निष्ठुर मृत्यूने त्यांना पहाटेचा चहा पिण्याइतकीहि सवड दिली नाही! ता. ३ सप्टेंबर १९५८ रोजीं पहाटे त्यांचें देहावसान झालें! सकाळीं नेहमीच्या संवयीप्रमाणे पहाटे ५ वाजतां ते झोपेंतून उठले. तोंड धुणें वगैरे प्रातर्विधि आटोपल्यावर चहाचा कप हातांत घेऊन तो तोंडाला लावणार तोंच त्यांचा प्राण त्यांच्या कुडींतून निघून गेला! There is many a slip betwixt the cup & the lip या म्हणीचें शोकान्त प्रत्यन्तर त्यांच्या बाबतींत अनुभवास आलें.

माधवराव सेवानिवृत्तीनंतर गेलीं कित्येक वर्षे चिपळूणलाच स्थायिक झाले होते. गेल्या दहाबारा वर्षांत त्यांचा माझा अनेकदा पत्रव्यवहार झालेला असला तरी या मुदतींत त्यांची प्रत्यक्ष भेट मात्र होऊं शकली नाही. पण ते मुंबईस असेपर्यंत त्यांची माझी बैठक झाली नाही असा महिना क्वचितच जाई. कित्येक वेळां दर रविवारीं सकाळीं ते माझ्याकडे यायचे नि तासन्‌तास गप्पा मारीत बसायचे. सभा-संमेलनांत अगर बाहेर कुठे गेले तर तोंडाला अगदी कुलूप घालून बसायचे, अगदी मुखस्तंभासारखे! माझी आई मला नेहमी म्हणायची "किती वेळ बडबडत बसतात हे तुझे काटदरे! त्यांना बोलायचा कंटाळा तरी कसा येत नाही!" पण ही त्यांची बडबड फक्त खाजगी बैठकींतच चालायची आणि तीसुद्धा अगदी कांही विशिष्ट ठिकाणींच. त्यांचा पोशाख अगदी साधा असे. अंगांत बंद गळ्याचा सोलापुरी कापडाचा लांब कोट, नेसायला धोतर, डोक्यावर वेलबुट्टीची टोपी, डाव्या हातांत अडकविलेली एक साधी पिशवी, पिशवींत गुप्तांच्या अगर मौर्यांच्या इतिहासाचीं रॉयल एशियाटिक ग्रंथालयांतून अगर धोबीतलावाच्या ग्रंथालयांतून आणलेलीं पुस्तकें, काखेंत छत्री व चिमटींत तपकीर या वेशांत ते नेहमी बाहेर दिसायचे. ठाकूरद्वाराला भावे आणि मंडळींचें पुस्तकविक्री व प्रकाशनाचें दुकान आहे. त्या ठिकाणीं सकाळीं अगर संध्याकाळीं ते नेहमी आढळायचे! त्यांची माझी पहिली भेट त्याच ठिकाणीं झाली. माधवरावांची ती मूर्ति अजून डोळ्यांपुढे येते. काव्याची असो अगर इतिहासाची असो, चर्चा ते मोठ्या आवेशाने करायचे. ते सर्व क्षण मला आज आठवतात. ऐतिहासिक कविता लिहिण्याकरिता त्या त्या ठिकाणीं स्वखर्चाने जाऊन, तेथील किल्ले अगर इतर ऐतिहासिक महत्त्वाचीं स्थळें प्रत्यक्ष पाहून त्यांनी जी मोठ्या कष्टाने माहिती गोळा केली, तशी माहिती क्वचितच दुसऱ्या कुणी मराठी कवीने केली असेल. ती माहिती गोळा करतांना त्यांना जे अनेक मनोरंजक अनुभव आले ते सांगतांना ते अगदी समरसून जात. किंबहुना म्हणूनच 'ज्योत्स्ना' मासिकासाठी मी त्यांना 'मी माझी ऐतिहासिक कविता कशी

लिहिली ' ( 'ज्योत्स्ना', नोव्हेंबर १९३६, पृ.७०. ) हा लेखासाठी विषय दिला होता. त्यांच्या मृत्यूची वार्ता कानीं आल्यावर या सर्व स्मृति आज मनांत जागृत होत आहेत व माधवराव आता यापुढे प्रत्यक्ष डोळ्यांना दिसणार नाहीत म्हणून मनाला दुःख होत आहे. रेव्ह. टिळक खिस्तवासी झाले त्या वेळीं माधवरावांनी लिहिलें होतें—

> अहा येशील तूं कैसा ? तुला आली महानिद्रा !
> दिसायाची न या लोकीं तुझी गंभीर ती मुद्रा !

माधवराव गेल्यामुळे मलाहि आज तसेंच म्हणावेंसें वाटत आहे.

माधवराव अगदीच अकालीं निवर्तले असें नसलें तरी त्यांच्यावर असलेल्या जबाबदाऱ्यांतून मुक्त होण्याच्या अगोदर थोड्या अनपेक्षितपणाने ते गेले म्हणून दुःख होतें हें खरें; पण यापेक्षाहि त्यांच्या हयातींत सरकार व समाज यांनी त्यांच्या ऐतिहासिक काव्याचें जितकें चीज करावयास हवें होतें तितकें केलें नाहीं याचें दुःख विशेष होतें. माधवराव हे स्वतः अबोल, प्रसिद्धिपराङ्मुख व भिडस्त स्वभावाचे गृहस्थ होते. कोणापुढेहि त्यांनी लाचारीने मान वेंगाडली नाही. मराठ्यांच्या स्वाभिमानाचे व निःस्पृहतेचे पोवाडे त्यांनी आपल्या ऐतिहासिक कवितांतून समरसतेने गाइले याचें कारण स्वाभिमान व निःस्पृहता हे गुण खुद्द त्यांच्या स्वतःच्या ठिकाणीं ओतप्रोत भरलेले होते; किंबहुना म्हणूनच सरकार व साहित्य अकादमी यांच्या दरबारीं त्यांच्या साहित्याची दाद पोचूं शकली नाही. नाहीतर त्यांच्या इतकी उत्कृष्ट व रसरशीत ऐतिहासिक व निसर्गविषयक कविता लिहिणारा कवि व ऐतिहासिक संशोधनांत रमलेला संशोधक खचित दुर्लक्षिला गेला नसता. माधवरावांच्या बरोबरच्या कितीतरी लहान मोठ्या मराठी वाङ्मयसेवकांवर सरकार व समाज यांची कृपादृष्टि व्हावी व महिना रु. ६० च्या सेवानिवृत्ति-वेतनांत सबंध कुटुंबाची गुजराण मोठ्या मिनतवारीने करणाऱ्या माधवांसारख्या श्रेष्ठ कवीकडे त्यांचें लक्ष जाऊं नये ही घटना मनाला बेचैन करते. मात्र खुद्द चिपळूण येथे त्यांच्या एकसष्टीनिमित्त त्यांचा सत्कार चिपळूणग्रामस्थांनी यथाशाग करून त्यांना हजार-पंधराशेची थैली अर्पण केली ही घटना चिपळूण येथील ग्रामस्थांना जितकी भूषणावह तितकीच बेचैनीच्या अवस्थेंतहि मनाला समाधान देणारी अशीच म्हटली पाहिजे.

असेंच समाधान देणारी आणखी एक घटना माधवरावांच्या मृत्यूच्या अगदी थोडे दिवस अगोदर घडली तिचाहि येथे उल्लेख करणें उचित होईल. मालवण येथें गेल्या मे महिन्यांत भरलेल्या चाळिसाव्या मराठी साहित्य संमेलनांत श्री. विठ्ठल सीताराम गुर्जर यांच्याच बरोबर माधवराव काटदरे यांचाहि सत्कार होऊन त्यांना श्रीफल व शाल अर्पण करण्यांत आली. कोकणांतील गरीब साहित्यप्रेमी जनसंमर्दानें साहित्यसंमेलनांत केलेला त्यांच्या साहित्य-सेवेचा तो प्रथम जाहीर गौरव होता म्हणून त्याला विशेष महत्त्व आहे. प्रकृतीच्या अस्वास्थ्या-मुळे माधवराव मालवणला उपस्थित राहूं शकले नाहीत. त्यामुळे त्यांचें दर्शन साहित्यिकांना घडूं शकलें नाहीं ही एकच गोष्ट त्या वेळीं खटकली.

माधवरावांच्या हयातींत जें घडूं शकलें नाहीं तें त्यांच्या निधनानंतर तरी घडावें या हेतूने साहित्य अकादमीला अगर कुणाहि प्रकाशकाला येथे एक सूचना करावीशी वाटते. 'कवि माधव यांची कविता' या नांवाने श्री. ह. वि. मोटे यांनी त्यांच्या कवितांचा एक संग्रह इ. स. १९३५ सालीं प्रसिद्ध केलेला आहे. त्याची दाद पुणें, नागपूर व मुंबई विद्यापीठांनी

ज्या प्रमाणांत घ्यायला हवी होती तितकी घेतलेली दिसत नाही. क्वचित् मधून तो संग्रह बी. ए. च्या अभ्यासक्रमांत लागला नाहीं असें नाही. पण त्या संग्रहांतील कवितांचें महत्त्व लक्षांत घेतां त्या संग्रहांतील कांही कवितांची योजना इंटरमीजिएट परीक्षांच्या अभ्यासक्रमांत करतां आली नसती असें नव्हे; पण तितकी आस्था अगर आवश्यकता अभ्यासक्रमसमितींत असलेल्या आमच्या मराठीच्या विद्वान् प्राध्यापकांना कदाचित् वाटली नसावी. या संग्रहांतील निर्भेळ ऐतिहासिक कविता एकत्र संकलित करून त्यांचें पुस्तक प्रस्तावनेसह प्रसिद्ध केल्यास साहित्य अकादमीला अगर प्रकाशकाला दुहेरी श्रेय मिळण्याची संधि मिळणार आहे. एक तर माधवरावांनीं परिश्रमपूर्वक लिहिलेल्या निर्भेळ ऐतिहासिक कवितांचें महत्त्व रसिकांना पटवितां येईल व दुसरी गोष्ट म्हणजे माधवरावांच्या कुटुंबाला त्यांतून आर्थिक साहाय्यहि पोचवितां येईल. असाच निसर्गविषयक कवितांचा सलग असा दुसरा संग्रहहि प्रसिद्ध करणें शक्य आहे. साहित्य अकादमीच्या सल्लागार मंडळावर मराठी भाषेचीं अनेक रसज्ञ मंडळी असल्यामुळे ही सूचना सफल होईल अशी आशा करावयास हरकत नाहीं.

## कवि माधव व त्यांची कविता

कवि माधव ऊर्फ माधव केशव काटदरे, हे विजयदुर्ग खाडीच्या काठीं असलेल्या गीर या गांवचे मूळ राहणारे. ते मुंबईला कस्टम खात्यांत नोकरीस होते. दहा-बारा वर्षांपूर्वीच सेवानिवृत्त होऊन ते चिपळूण येथे स्थायिक झाले होते. इ. स. १९३५ सालीं ' कवि माधव यांची कविता ' या नांवाने त्यांच्या समग्र कवितांचा संग्रह प्रसिद्ध झालेला आहे. इतिहासाचे ते गाढे अभ्यासक असल्यामुळे त्यांनी इतिहासविषयक बरेच लेखहि लिहिलेले आहेत. शिवाय लहान मुलांसाठी त्यांनी छोट्यामोठ्या कथाहि लिहिलेल्या आढळतील. ' मनोरंजन ' मासिकांतून त्यांची एक ऐतिहासिक कादंबरी क्रमशः प्रसिद्ध झालेली आढळते. इ. स. १९१२ सालीं नोकरीच्या निमित्ताने ते प्रथम मुंबईस आले व सेवानिवृत्त होईपर्यंत त्यांचें वास्तव्य मुंबईसच होतें. मुंबईला येण्यापूर्वी ते रत्नागिरी हायस्कूलमध्ये शिकत असतांनाच त्यांनी काव्यलेखनास सुरवात केली. न्या. मू. महादेव गोविंद रानडे यांच्या Rise of the Maratha Power या पुस्तकाचा व रत्नागिरी हायस्कुलांतील एक शिक्षक विठ्ठल जयराम जोशी यांच्या विचारसरणीचा त्यांच्या मनावर परिणाम होऊन त्यांचें लक्ष मराठ्यांच्या इतिहासाकडे व प्राधान्येंकरून त्या इतिहासांतील स्फूर्तिदायक प्रसंग व घटना यांच्याकडे खेचलें गेलें. या आकर्षणांतून त्यांची ऐतिहासिक स्वरूपाची कविता निर्माण झालेली आहे. इंग्रजी वाङ्मयांतील ऐतिहासिक कादंबऱ्या व इतिहासाचीं अनेक पुस्तकें यांचें वाचन त्यांनी केलेलें आहे. या वाचनांतून व मननांतूनच त्यांचें ऐतिहासिक काव्याचें स्वरूप निश्चित झालें. ऐतिहासिक कविता लिहिण्याच्या मागचें त्यांचें धोरण कोणतें होतें हें त्यांच्याच पुढील शब्दांत दिसून येण्यासारखें आहे.

## ऐतिहासिक कवितेबद्दल धोरण

" मी ऐतिहासिक कवितेचें धोरण ठरवितांना असें ठरविलें कीं, इतिहाससंशोधनांत नवे नवे शोध कांहीहि लागोत आणि रोजच्या रोज नवीं नवीं मतें कांहीहि पुढे येवोत, न्या. मू. रानडे यांनीं मराठी इतिहासाकडे पाहण्याची जी नवी दृष्टि महाराष्ट्राला दिली त्याच दृष्टीने ऐतिहासिक कविता लिहितांना मराठी इतिहासाकडे पाहावयाचें. न्या. मू. रानडे महाराष्ट्राविषयी बोलतांना संताळ्याच्या मागे जात नाहींत. पण आपली पूर्वपरंपरा इतकी

मर्यादित ठेवणें मला इष्ट वाटत नाही. न्या. मू. रानडे प्रार्थनासमाजिस्ट होते तसे डॉ. भांडारकरहि होते; पण न्या. मू. रानड्यांचा जसा संताळ्यांवर भर होता तसा डॉ. भांडारकरांचा वेद, वेदांगें, उपनिषदें यांवर होता. डॉ. भांडारकर मनाने जितक्या जुन्या काळांत वावरत, तितक्या जुन्या काळापर्यंत ऐतिहासिक कवितेच्या बाबतींत आपली पूर्वपरंपरा मानावयाची असें मीं ठरविलें. महाराष्ट्राविषयी काही विशेष गोष्टी निर्माण करून त्या कायमच्या गृहीत धरल्या. त्या अशा —

( १ ) अगस्ति हा महाराष्ट्राचा Guardian Star होय.

( २ ) निळावन्ति ही इस्लामच्या उदयकाळापासून समुद्रावर सत्ता चालविणारी आणि एतद्देशीय उत्कर्ष सहन न करणारी अशी एक दुष्ट समुद्र-देवता होय.

( ३ ) सतराव्या शतकापासूनच्या महाराष्ट्राचा रामदास हा Guardian Saint होय.

( ४ ) चंदनाहिरा व बनाई हीं नवप्रदेशांतील अनुक्रमें Fairy King आणि Fairy Queen होय.

( ५ ) परशुराम हा कोकणचा स्वामी होय व कोंकणदेवी ही पश्चिमेच्या बाजूने कोकणाचें रक्षण करणारी देवता होय.

( ६ ) भगवा झेंडा हा मराठ्यांना अनासक्तीची शिकवण देणारा ध्वज होय आणि जरीपटका हा त्यांच्या वैभवाचें प्रतीक होय.' *

ऐतिहासिक कविता लिहिण्याचें हेंच धोरण दृष्टीपुढे ठेवून माधवराव काटदऱ्यांनी आपल्या ऐतिहासिक कविता लिहिलेल्या आहेत. त्यांच्या विशेष लोकप्रिय झालेल्या ऐतिहासिक कवितांत ' शिवराज–स्तव,' ' शनिवारवाड्यापुढे,' ' शिवकालीन रायगड,' ' गोखलखां,' ' जिवबादादा बक्षी,' ' तारापूरचा संग्राम,' 'सवाई माधवरावाचा मृत्यु,' या कवितांचा उल्लेख करणें अपरिहार्य आहे. या सर्व ऐतिहासिक कवितांतून आधुनिक काव्यपद्धतीचा व प्रकारांचा जसा त्यांनी उपयोग केला आहे, त्याप्रमाणे त्यांचें कोकणप्रेम व महाराष्ट्रप्रेमहि प्रामुख्याने दिसून आल्याशिवाय राहत नाही. मराठ्यांच्या इतिहासांतील स्फूर्तिप्रद व काव्याला अनुकूल असे प्रसंग वेचूनच त्यांनी, त्यांच्याच शब्दांत बोलावयाचें म्हणजे

साधायला व्यक्तिहित
राष्ट्राचा करिती घात
पद त्यांच्या देऊन शिरीं
चालवितो शाहीरगिरी !

अशी ' शाहीरगिरी ' केलेली आहे.

ऐतिहासिक स्वरूपाची कविता लिहितांना प्रचारापेक्षा कलेकडे त्यांनी प्राधान्याने लक्ष दिलेलें आहे हें त्यांच्या कवितेचें एक वैशिष्ट्य होय. ऐतिहासिक कवितांतील ही कलात्मकता अगर साक्षेपशील वृत्ति कित्येक टीकाकारांना विसंगत वाटते. कारण भावनांचा जो रसरशीत-

* मीं माझी ऐतिहासिक कविता कशी लिहिली. ले. माधव केशव काटदरे ज्योत्स्ना–नोव्हेंबर १९३६ पृ. ७०.

पणा त्या कवितांत ते अपेक्षित असतात तो उत्कटतेंत अपुरा पडतो असें त्यांचें म्हणणें. याचा अर्थ एवढाच की, या टीकाकारांना राष्ट्रीय कविता व निर्भेळ ऐतिहासिक कविता यांतील भेद कळलेला नाही अगर त्यांनी तो कळून घेण्याचा प्रयत्न केलेला नाही.

इ. स. १९१२ ते १९२० या कालांत महाराष्ट्रांतील मासिकांत मुख्यत्वेंकरून प्रेम-विषयक कवितांनाच प्रसिद्धी मिळत असे. अपवाद म्हणायला अनंततनयांच्या ऐतिहासिक स्वरूपाच्या कविता मात्र ' चित्रमयजगत्'मध्ये नेमाने प्रसिद्ध होत. पण आपल्या ऐतिहासिक कवितांना प्रसिद्धि मिळविण्यास माधवरावांना वशिल्याचा उपयोग करावा लागला श्री. भालचंद्र शंकर देवस्थळी यांच्या मध्यस्थीने त्यांच्या कविता ' नवयुग ' मासिकांत येऊं लागल्या. त्या वेळीं ' नवयुग ' मासिकाचे मालक डी काशिनाथ व संपादक गणेश विठ्ठल कुलकर्णी हे होते.

माधवराव हे सरकारी नोकर होते व त्या दृष्टीनेहि त्यांनी ऐतिहासिक कविता लिहितांना आपल्यावर कांही विशिष्ट बंधनें घालून घेतलेलीं होतीं, हें येथे सांगणें आवश्यक आहे; किंबहुना म्हणूनच १९१८ सालच्या राणीच्या जाहीरनाम्यानंतर महाराष्ट्रांत घडलेल्या घटनांचें प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत कोठेच आढळत नाही; इतकेंच नव्हे तर, ज्या ऐतिहासिक घटनांचा व प्रसंगांचा त्यांनी आपल्या कवितांत उपयोग करून घेतलेला आहे, त्यांना चुकूनहि राजकीय अगर जातीय कलाटणी देण्याचें त्यांनी कटाक्षाने टाळलेलें आहे. इतर कवींनी लिहिलेल्या ऐतिहासिक कविता व माधवांनी लिहिलेल्या ऐतिहासिक कविता यांत जो फरक आढळतो याचें कारण ऐतिहासिक घटना व वातावरण यांचा निर्भेळपणा आपल्या कवितांत राखण्यांत माधवांनी अप्रतिम कौशल्य प्रकट केलेलें आहे, हेंच होय.

निर्भेळ ऐतिहासिक कवितांचें लेखन हें जसें माधवांच्या कवितेचें एक उल्लेखनीय वैशिष्टय आहे, तसेंच कोकणांतील निसर्ग व कोकणांतील वातावरण यांचा कलात्मक वापर त्यांनी आपल्या कवितांतून केलेला आहे, हेंहि नजरेआड करून चालणार नाही. महाराष्ट्राच्या अभिमानाइतकाच कोकणांतील निसर्ग–सौंदर्याचा त्यांचा अभिमान बोलका आहे. 'सोनावळ ' व ' कुरडू ' या कोकणांतील खास फुलांवर त्यांनी स्वतंत्र कविता लिहिल्या आहेत. तसेंच निसर्गाचें सौंदर्य मोठ्या कलात्मक व काव्यात्मक तपशिलाने ' हिरवें तळकोकण ' या कवितेंत त्यांनी टिपून घेतलेलें आहे.

पिवळी ती
तव कान्ती
रमवी माझ्या मना अति
गिरीवरी
रानभरी
कोणा येना तुझी सरी !
सोनावळ मी वनराणी

हें ' सोनावळी ' चें वर्णन व

तुरे साजिरे तांबुस ढवळे खोवुनि अपुल्या शिरीं
हर्षभराने डोलत राहे वनांत कुरडू तरी

अनुक्रमणिका

ऐतिहासिक असो अगर निसर्गविषयक असो, त्यांची सारीच कविता कथनात्मक अगर वर्णनात्मकच आहे.

## कोकणांतील निसर्गाचें सौंदर्य

सह्याद्रीच्या पायथ्याशीं असलेल्या कोकणाचें वर्णन याच पद्धतीने त्यांनी केलेलें आहे. मंजुळ गाणीं गात झुळूझुळू वाहणारे झरे, कड्याकडयांवरून कोसळणारे पाण्याचे प्रपात अगर धबधबे, वळणावळणांनी जाणाऱ्या नद्या; तेरडा, कुडा, सोनावळ, बकुळी, नेवाळी, नादवटी, कोरांटी, गोकर्णी, केतकी, शिताबाई, इत्यादि खास कोकणांतील फुलें अगर फुलझाडें, आंवळी, जांभळी, पिंपळ, चिंच, वड, बेहडा, सात्विण, पांगारे, शेवरी, फणस, आंबा, रातंबी, कळकी, करवंदी, आईन, किंजळ इत्यादि झाडें व फळझाडें यांचें कौतुकास्पद तपशिलाने व काव्यात्म पद्धतीने त्यांनी केलेलें वर्णन हेंच 'हिरवें तळकोकण' या कवितेचें वैशिष्टय आहे.

शिताबाइच्या गोड हातचे पोहे जे कानर्नी
रागाने दे बाइलवेडा कवडा भिरकावुनी,
रोपें त्यांची बनुनि पसरलीं नाचत चोंहीकडे
अजुनि पहा या मण्डित त्यांनीं कोंकणचे हे सडे !
इतिहासाला वार्ता ज्याची श्रुत नाही जाहली,
दन्तकथांसहि विस्मृति ज्याची होउनियां राहिली,
'झिम्मा खेळे कोंकणचा तो नृपाळ' म्हणती मुली
'गळे वसन्तीं टपटप जेव्हां आंब्याची डाहळी !'

या वर्णनावरून माधवांची जशी पौराणिक कथा व दन्तकथा निर्माण करण्याची (myth-making power) व त्या कथा वर्णनांत चपखल बसविण्याची शक्ति दिसून येते त्याचप्रमाणे

धुन्द सिन्धुला मारवेलिची मर्यादा घालुन
उभी सैकतीं कोंकणदेवी राखित तळकोंकण,
निकट माजली निवडुंगाचीं वेटें कंटकमय
आश्रय ज्यांचा करुनि नान्दती कोचिंदे निर्भय
मागें त्यांच्या डुले नारळीपोफळिचें आगर
पुढें विराजे निळावन्तिचें निळेंच जळमन्दिर !
राष्ट्रदेविचें निसर्गनिर्मित ऐसें नंदनवन
सह्याद्रीच्या तळीं शोभतें हिरवें तळकोंकण

या वर्णनावरून त्यांची कल्पनाशक्तीहि प्रतीत झाल्याविना राहत नाही.

शुद्ध भाषा, नादमधुर शब्दरचना, अन्वर्थक शब्दयोजना व अलंकारांचा संयमित अगर मर्यादित वापर हीं माधवरावांच्या काव्यरचनेचीं वैशिष्ट्यें सांगतां येतील. त्यांची बहुतेक कविता वस्तुनिष्ठ स्वरूपाची असल्यामुळे व त्यांची निर्मिति अभ्यास व निरीक्षण यांतून झाल्यामुळे, उत्कटता हा गुण त्यांच्या कवितांत कमी आढळतो. अद्भुताचें आकर्षण त्यांच्या प्रतिभेला आहे, हें त्यांच्या 'मोऱ्यांची मोहना'.

तुकाराम ' या त्यांच्या कवितांवरून दिसून येईल. विशेषत: ' मोऱ्यांची मोहना ' व ' सन्त तुकाराम ' या कवितांतून अद्‌भुताप्रमाणेच कोंकणांतील निसर्गाचें वातावरण परिणामकारक-रीतीने निर्माण करण्यांत त्यांचें भाषाप्रभुत्व प्रकट झालेलें आहे. दोन्ही कविता शोकान्तिका आहेत. ' मोऱ्यांची मोहना ' या कवितेंतील पुढील ओळी कोंकणांतील वातावरण किती प्रभावीपणाने निर्माण करतात तें पाहण्यासारखें आहे.

ज्यावरि अपुलें रूप पहाया ओथंबे जांभुळ
घालुनि कुटरू थकला कवडा प्राशी ज्याचें जळ
त्या डोहाच्या दक्षिणतीरीं उभी लोललोचना
शीरगांवच्या मानकऱ्यांची मोऱ्यांची मोहना !
डाव्या बाजुस वाघजाइचें हांकेवर देउळ,
उजव्या बाजुस हांकेवरतीं खेमाचें राउळ;
मागें ' पोकीं धोंड ' विस्मयें पसरी निज आनना !
कवडेकोंडावरी सांवळी मोऱ्यांची मोहना !

किंबहुना या सबंध कवितेंतील वर्णनें, 'वारा वांवा', ' गावला, ' ' जुवें ' वगैरे अस्सल कोंकणी शब्द व अद्‌भुतरम्य कथाभाग यांमुळे 'मोऱ्यांची मोहना' या कवितेला वातावरण-निर्मितीच्या दृष्टीने महत्त्व प्राप्त झालें आहे. कथेचा परिणामकारक परिपोष करण्याचें सामर्थ्य माधवांच्या लेखणींत असतें तर कथा-काव्य लिहिण्यांत ते नि:संशय यशस्वी झाले असते. पण उत्कटतेचा हा अभाव त्यांच्या सर्वच ऐतिहासिक कवितांतून आढळून येतो.

' सन्त तुकाराम ' या कवितेंतहि कोंकण-किनाऱ्यावरील समुद्राचें वर्णन व अद्‌भुतरम्य वातावरण यांचा संगम मोठ्या कौशल्याने त्यांनी साधला आहे. सन्त तुकाराम ही बोट १२ नोव्हेंबर १९२७ रोजीं श्रीवर्धनजवळील बंदरांत बुडाली. या घटनेवर माधवरावांनी ही कविता लिहिलेली आहे.

अफाट दर्यांत धांवती वारे बेफाम
जयगडला जाया निघाली सन्त तुकाराम
अदृशांत काय कुणाला ठाउक तें नाहीं !

पुढील संकटाची पूर्वसूचना देणाऱ्या या शब्दांत त्यांनीं कवितेची सुरवात केली आहे. ज्या अरबी समुद्रांतून तुकाराम बोट पाणी कापीत जात होती त्या समुद्राचें पुढील वर्णन—

नव्हे चंद्रभागा—नव्हे हें—इंद्रायणि नीर;
भवत्पदांखालीं—उसळतो—समुद्र गंभीर
याच्यावरि झाला—मराठी—नशिबाचा खेळ
लहरींतुनि याच्या—उगवले—गेले सर्खेल !

सरदार आंग्रे यांच्या पराक्रमी आरमाराचें मोठ्या सूचकतेने दर्शन घडवितें यांत शंका नाही. निळावंती ही समुद्रावर सत्ता चालविणारी व एतद्देशीय उत्कर्ष सहन न करणारी एक दुष्ट समुद्र-देवता आहे ही कल्पना माधवांनी गृहीत धरलेली असून, तिचा संबंध

तुकारामाच्या जलसमाधीशीं लावण्यांत माधवरावांची कल्पनाशक्ति व योजकता प्रकट झालेली दिसून येते.

उदकांवरि सत्ता गाजवी आज निळावन्ती !
श्रावणि पुनवेच्या श्रीफळें तिज नाहीं तृप्ति !
तिच्या इंद्रजालें आज हें उठलें काहूर !
तिच्या इंद्रजालें आज हें जौळ करी जोर !

या वर्णनांत नारळीपौर्णिमेला समुद्र शांत होण्यासाठी समुद्रांत नारळ टाकण्याच्या कोकणांतील प्रथेचाहि मोठ्या मार्मिकपणाने त्यांनी उपयोग केला आहे. तुकाराम बोट बुडाली व त्या बोटींतील माणसें अगर सामान कांहीच हातास लागलें नाही, या वस्तुस्थितीला, अद्‌भुतरम्य कलाटणी देणारा कवितेचा हेतीं त्यांनी पुढील ओळींनी साधला आहे. ....

सिंधुतळीं बैसलें आजवरि जाउनि जें कांहीं
बाह्यजगीं शब्द तयाचा कधि उठला नाहीं.
संत तुकाराम बुडाली परंतु ज्या ठायीं
शब्द अजुनि उठती तेथुनी विठ्ठलरखुमाई !

कविता संपते; पण वाचकाच्या मनांतून तुकाराम बोटीच्या भीषण अपघाताचे विचार जातां जात नाहीत ! इतकेंच नव्हें तर, कवितेंतील निसर्गाचें व अद्‌भुतरम्यतेचें वातावरण मनांत सारखें रेंगाळत राहतें. कथानक अगर वर्णनात्मक कवितांत हें वातावरण निर्माण करण्याची हातोटी माधवरावांना बेमालूम साधलेली होती, हीच त्यांच्या काव्याची थोरवी आहे. ● ● ●

---

[ पत्रव्यवहार, पान ४ वरून पुढे चालू. ]

अध्याय करावयाचा असें ठरविलेलें दिसतें. पुढें २२ व्या प्रसंगाचे तीन अध्याय पाडलेले दिसतात.

याप्रमाणें जरी संतोषमुनीने २८ अध्यायांचें रुक्मिणी स्वयंवर रचण्याचा संकल्प केला असला तरी तो सिद्धीस गेल्याचें दिसत नाहीं. कारण तशा हस्तलिखित प्रती अद्याप कोठे सापडल्याचें प्रसिद्ध नाही. पौषदाख्याने या काव्याचें शोधन करून ५३५ ओव्यांची भर घालून तो ३७४० ओव्यांचा केला. हें काम त्याने शके १६४१ मध्ये केल्याचें महाराष्ट्र सारस्वतांत आहे. लवकरच संतोषमुनीचें रुक्मिणी स्वयंवर छापलें जाण्याचीं चिन्हें दिसत आहेत तेव्हा या मुद्द्यावर प्रकाश पाडला जाईलच. संतोषमुनीची वाढाव्याची रूपरेषा व पौषदाख्य मुनीने प्रत्यक्ष घातलेली भर यांमधील साम्य–वैषम्यहि कळेलच. एका रुक्मिणी स्वयंवराच्या कथानकावर महानुभाव कवींनी निदान २५–३० तरी काव्यें रचलेलीं असावींत. महदंबेच्या धवळ्यापासून या विषयावर काव्यरचना होऊं लागली; म्हणजे चारशे वर्षे अथवा त्याहूनहि जास्त काल या विषयावरच काव्यें झालीं. त्या सर्वांचा अभ्यास हा एक स्वतंत्र विषयच आहे व तो अभ्यासण्याजोगाहि आहे. कळावें.

आपला,
नारायण बळवंत जोशी,
विजापूर.

[ कव्हर पान २ वरून पुढे चालू. ]

क्षीरसागर व श्री. वि. स. खांडेकर यांनी भाषणें करून आचार्य अत्रे यांच्या विविध गुणांचा व कार्याचा गौरव केला. श्री. अत्रे यांनी सत्काराला उत्तर देतांना आपण विनोदी वक्ते व लेखक कसे झालों याची तासभर भाषण करून हास्यस्फोटक मीमांसा केली. म. म. पोतदार यांच्या मार्मिक भाषणानंतर मो. रा. वाळंबे यांनी आभार मानले व तब्बल तीन तास चाललेला हा समारंभ संपला. सत्कार-समारंभापूर्वी आचार्य अत्रे यांना परिषदेच्या कार्यकर्त्यां-समवेत अल्पोपहार देण्यांत आला.

**हिंदी लेखकांची भेट :**—हिंदीचे सुप्रसिद्ध लेखक श्री. विष्णु प्रभाकर व श्री. यशपाल जैन यांनी दि. १९ सप्टेंबरला परिषदेला भेट दिली. याप्रसंगीं जमलेल्या प्रा. डांगे, प्रा. शं. दा. चितळे, श्री. डिंगरे, डॉ. न. का. घारपुरे, श्री. ग. रा. वाळिंबे इत्यादि मंडळींबरोबर त्यांनी साहित्यविषयक चर्चा केली. परिषदेतर्फे दोघांचा सत्कार करण्यांत आला.

**शाखा-सभा-वृत्तान्त :**—करवीर ( कोल्हापूर ) शाखाधभेतर्फे दि. २४ ऑगस्टला डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांच्या नेतृत्वाने श्री. वि. स. खांडेकर यांचा षष्ठ्यब्दपूर्तीनिमित्त सत्कार करण्यांत आला. याप्रसंगीं डॉ. ल. म. भिंगारे, डॉ. उषा पोतदार, प्रा. गो. के. भट, श्री. दिनकर पाटील यांचीं भाषणें झालीं. डॉ. श्रीखंडेकृत १२ श्लोकांचें मानपत्र व गणेश, सरस्वती, लक्ष्मीची चांदीची प्रतिमा श्री. खांडेकर यांना अर्पण करण्यांत आली. सत्कारानंतर श्री. खांडेकर यांचें ' हरिभाऊ व शरश्चंद्र ' या विषयावर विचारप्रवर्तक भाषण झालें. ● ● ●

---

# साभार स्वीकार

( पान ४८ वरून पुढे चालू. )

## वोरा ॲण्ड कं. पब्लिशर्स प्रायव्हेट लिमिटेड, ३ राउंड बिल्डिंग, काळबादेवी रस्ता, मुंबई–२, यांचीं प्रकाशनें.

१ **सांस्कृतिक-महाराष्ट्र-दर्शन** :–( संच १ ला )–६ पुस्तकें : सुंदर तें ध्यान ( शं. रा. देवळे); जय जय रघुवीर समर्थ (अमरेन्द्र); ज्ञानोबा माउली (रा. चिं. ढेरे); एका जनार्दनी (रा. चिं. ढेरे); मल्हारी मार्तंड (शं. रा. देवळे); तुका झालासे कळस (रा. चिं. ढेरे). मूल्य प्रत्येकीं ६० नये पैसे. सहा पुस्तकांची संच-पेटी, मूल्य रु. ३·६०.

२ **सांस्कृतिक-महाराष्ट्र-दर्शन** :–(संच २ रा )–६ पुस्तकें : श्रीगोंदे, भवताप हरी (ढेरे); मंगल मूर्ति मोरया (ढेरे); जय जगदंब (चिं. ग. कर्वे); श्रीगुरुदेव दत्त (ढेरे); जय भवानी (शं. रा. देवळे); माझा मऱ्हाटाचि बोलु कवतिकें (रं. म. जोशी–निर्मळ गुरुजी). प्रत्येकीं ६२ न. पै. ६ पुस्तकांचा संच, रु. ३·७२.

३ **महाभारत**–(ज. स. करंदीकर).

४ **शिल्पकार**–(श्रीकान्त राय) मूल्य रु. १·२५.

५ **विश्वाच्या कळसावर** – (श्रीकान्त राय), मूल्य रु. २.

६ **मराठी शेक्सपियर** – (पहिलीं ८ पुस्तकें) मूल्य प्रत्येकीं रु. १·२५.

७ **कथावैभव** (प्रातिनिधिक कथासंग्रह) मूल्य ·५.

८ **अंधारवड**–(न. चिं. केळकर), मूल्य रु. २.

९ **कोनटिकी**–( अनु. श्रीकान्त राय ) मूल्य रु. २.

---

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर. )
   ले-कै. बा. अ भिडे ( प्रती शिल्लक नाहींत. )
२. म. सा. परिषद्-इतिहास
   ले. म. म. प्रा. द. वा पोतदार — मूल्य ३ रु
३. संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति
   ले. प्रा. गं. बा. सरदार .... — मूल्य २ रु.
४. वाङ्मयीन समालोचन ( १९४७ ) — मूल्य २ रु.
५. शुद्धलेखननियम .... .... — मूल्य २ आ.
६. वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) — मूल्य ३ रु.
७ निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) ... — मूल्य २॥ रु.
८. साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेस लावलेलें ) .... — मूल्य २॥ रु.
९. सारस्वत-प्रवेश ( प्रथमा परीक्षेस लावलेलें ) ... — मूल्य २ रु.

क्र. ७, ८ व ९ हीं पुस्तकें सोडून इतर पुस्तकें सभासदांस सवलतीच्या दराने मिळतील. ( टपालखर्च वेगळा. )

मागणीस्थळः—चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

मुद्रक :- म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशक :- य. दि. पेंढरकर, कार्याध्यक्ष, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक-रस्ता, पुणें २.